

नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अक बारावा ... सप्टेंबर १९५०

मासिक



संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत – श्री. हरि कृष्ण मोहनी – प्रा. वि. म. बेडेकर
का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक र. ग. जोशी यांनीं सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापून सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.





# ' नवभारत ', सप्टेंबर १९५०

## लेखक-परिचय

[ या अंकांतील खालील लेखकांशिवाय बाकीच्या लेखकांचे लेख ' नवभारतां 'त या वर्षी यापूर्वी आले असून त्या त्या वेळीं त्यांचा परिचय दिला आहे.—का. सं. ]

**श्री. रा. कृ. पाटील,** बी. एस्सी., एल्एल. बी., आय. सी. एस्. — (नवी दिल्ली). भारतीय मध्यवर्ती सरकारच्या ' प्लॅनिंग कमिशन ' चे सदस्य.

**श्री. जे. सी. कुमारप्पा,** एम्. ए. ( कोलंबिआ ), बी. एस्सी., एफ्. एस्. ए. ए.( लंडन ) — मगनवाडी, वर्धा. सुप्रसिद्ध गांधीवादी अर्थशास्त्रज्ञ. ' Public Finance and Our Poverty ', 'Why the Village Movement' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**श्री. वाळुभाई मेहता—** निष्ठावंत गांधीवादी विधायक कार्यकर्ते. खांडबारा येथील पश्चिम खानदेश सर्वोदयकेन्द्राचे संचालक. ' खादीमीमांसा ' ' हिंदुधर्माचीं मूलतत्त्वें व पुनर्घटना' (अनुवादित), इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**श्री. एस्. एम्. जोशी—** ( पुणें )– सुप्रसिद्ध समाजवादी विचारवंत व कार्यकर्ते. ' ऊर्मि ' या पुस्तकाचे लेखक.

**श्री. अण्णासाहेब सहस्रबुद्धे—** सुप्रसिद्ध विधायक कार्यकर्ते मध्यवर्ती सरकाच्या ' प्लॅनिंग कमिशन'च्या सल्लागार मंडळाचे सदस्य.

**आचार्य वि. प्र. लिमये —** मुंबई येथील ' नवभारत ' या दैनिकाचे संपादक. ' अल्बेरुणीची गीता व इतर निबंध ', ' प्रांतिक स्वराज्य ! ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**डॉ. य. कृ. सोवनी—** वाङ्मय–आयुर्विद्या–विशारद ( टि. म. वि. ). ' संयुक्त महाराष्ट्राची माहिती ' या पुस्तकाचे लेखक.

---

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास पोषक होईल अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.

या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याहि विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.

संचालक व संपादकमंडळांतील सर्व व्यक्ती यांचेंहि सर्व विषयांत मतैक्य आहे, असें नाहीं. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधीं सदृश अशा दृष्टिकोनानेंच त्यांना एकत्र आणलें आहे. तथापि प्रत्येकाचें व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होतां, विकास व्हावा या दृष्टीनेंच त्यांचें सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ति आपल्या नांवानें प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.









अनुक्रमणिका

श्री. रा. कृ. पाटील

# काँग्रेसचें भवितव्य

## फाळणी अपरिहार्य होती

काँग्रेसच्या भवितव्याबाबत अंदाज वर्तविणें ही सध्यां फॅशनच झाली आहे. ता. १५ ऑगस्ट १९४७ रोजीं भारताला स्वातंत्र्य मिळाल्यापासून काँग्रेसच्या लोकप्रियतेला बरीच घसरगुंडी लागलेली आहे ही गोष्ट बहुतेक प्रत्येकजण कबूल करील. तोंपर्यंतच्या काळांतला या संघटनेचा इतिहास अपूर्वाईनें भरलेला आहे. तीन पिढ्यांपर्यंत काँग्रेसनें भारतीय स्वातंत्र्याचा लढा सतत चालूं ठेवला आणि सरतेशेवटीं या थोर संघटनेला यश लाभून भारताला स्वातंत्र्यप्राप्ति झाली. भारताची फाळणी काँग्रेस संघटनेनें मान्य केली हा तिच्या उज्ज्वल यशाला मोठा कलंक लागला यांत शंकाच नाहीं. परंतु आपल्याला ज्या रीतीनें स्वातंत्र्य मिळालें, तिचा विचार करतां ही फाळणी अपरिहार्य होती असें दाखवून देतां येईल. मुसलमानांसाठीं पाकिस्तान तोडून दिल्याशिवाय भारत सोडून जायचें नाहीं हा ब्रिटिशांचा निर्धार होता. मध्यवर्ती सरकारांतला संमिश्र मंत्रिमंडळाचा प्रयोग अयशस्वी ठरला होता. प्रांतिक आणि मध्यवर्ती सरकारांत अधिकारस्वीकार केल्यामुळें क्रांतीची प्रेरणा तात्पुरती थांबली होती. तेव्हां फाळणी तावडतोब न स्वीकारावी, तर एकच पर्याय उरला होता आणि तो म्हणजे यादवी-युद्ध ! परंतु त्याला तर कोणाचीच तयारी नव्हती आणि त्याचे परिणाम काय झाले असते याचा कोणालाहि अंदाज लागण्यासारखा नव्हता. शिवाय त्यामुळें आपोआपच ब्रिटिशांची भारतावरील पकड अधिक भक्कम झाली असती आणि फाळणीची मागणी कोणत्याहि रीतीनें कमी होण्याचा संभव नव्हता. किंबहुना, त्यामुळें फाळणीची शक्यता अधिकच जलदीनें उपस्थित झाली असती. दुसरा पर्याय म्हणजे मध्यवर्ती सरकारांतून आपलें अंग काढून घेणें आणि आपल्या मुसलमान बांधवांना शहाणपण सुचेल या भरंवशावर वाट पहात रहाणें. परंतु इतिहासाचा दाखला पाहिला, तर या गोष्टीची शक्यता मुळींच नव्हती. उलट ब्रिटिशांचा अंमल येथें सुस्थिर असतांना आणि वाटेल तें करून मुसलमानांच्या मागण्या पुरवावयाचा त्यांचा निर्धार असतांना, जरी कांहीं काळ चळवळ केली असती आणि अधिकारपदें स्वीकारलीं नसतीं तरीसुद्धां या पेंचप्रसंगांतून बाहेर पडण्याचा मुळींच मार्ग नव्हता. तेव्हां, असें म्हणतां येईल, कीं त्या परिस्थित्यनुसार देशाची फाळणी मान्य करणें हा एकच मार्ग होता आणि म्हणून काँग्रेसनें ती मान्य केली. फाळणीला संमति दिल्यानें गेल्या कैक पिढ्यांनीं संयुक्त व लोकशाही भारताच्या स्वातंत्र्याचीं जीं स्वप्नें चितारलीं होतीं आणि जीं ध्येयें जोपासलीं होतीं, त्यांना फारच जबरदस्त धक्का बसला. परंतु भावी प्रगतीची किंमत म्हणून हें ' पौंडभर मांस ' द्यावेंच लागलें !

## स्वातंत्र्योत्तर कांग्रेसचें कार्य

नंतरच्या काळांत काँग्रेसनें केलेल्या राज्यकारभारांतहि अनेक चांगले गुण निश्चित दिसून येण्यासारखे आहेत. नव्यानेंच जन्माला आलेल्या या राष्ट्रानें अराजकांतून सुसूत्रता साधण्याच्या कामीं आणि विविधेंतून एकता निर्माण करण्याच्या बाबतींत जी चपळाई आणि जो भक्कमपणा दाखवला, त्याचें भविष्य धूर्तांतल्या धूर्त आशावादी माणसालाहि

त्या वेळीं वर्तवितां आलें नसतें. कोणत्याहि रीतीच्या धाकदपटशाचा देखावाहि न करतां संस्थानें विलीन करण्यांत आलीं आणि हटवादी निजामालाहि हैदराबादचे भारताशीं असलेले राजकीय आणि भौगोलिक संबंध मान्य करावेच लागले. आर्थिक क्षेत्रांतहि, शेतकीविषयक सुधारणा हळूहळू अंमलांत आणण्यांत येत आहेत आणि सरंजामशाहीच्या शेकडों वर्षांच्या जुलुमापासून शेतकऱ्यांना मुक्त करण्यांत येत आहे. काश्मीरमधल्या लढाईमुळें आणि अवाढव्य अशा निर्वासितांच्या प्रश्नामुळें जरी तिजोरीवर पुष्कळच ताण पडत असला, तरी जनतेची स्थिति सुधारण्याचे उपाय भारतामध्यें सर्वत्र योजण्यांत येत आहेत.

परराष्ट्रीय घडामोडींच्या क्षेत्रांत आपल्या राष्ट्राची इभ्रत पुष्कळच मोठी आहे. कोणत्याहि बलिष्ठ राष्ट्राच्या गटामध्यें सामील न होतां भारतानें आपलें स्वतंत्र धोरण कायम ठेवलें आहे. आपला देश अव्वल प्रतीचा राष्ट्रवादी आहे आणि त्याचबरोबर संयुक्त राष्ट्रांचा सभासदहि आहे, या गोष्टी लक्षांत घेऊनच आपलें काश्मीरबाबतचें धोरण ठरविण्यांत आलें आहे. अमेरिकेनें ज्या रीतीनें कोरियामधील आक्रमणाचा प्रतिकार केला, त्याच पद्धतीनें आम्हींहि काश्मीरमधल्या आक्रमणाला तोंड दिलें. परंतु आमच्या लष्करी सामर्थ्याच्या वरचढपणाचा फायदा घ्यावयाचें नाकारून आम्ही काश्मीरच्या जनमताचा कौल आणि संयुक्त राष्ट्राची मध्यस्थी हीं मान्य केलीं आहेत.

एकंदरींत निःपक्षपातीपणानें पाहणाऱ्या कोणालाहि हें सर्व कार्य भव्य आहे हें मान्य करावेंच लागेल. परंतु इतकें असूनहि काँग्रेसची बहुजनसमाजांतील लोकप्रियता ढासळूं लागली आहे, ही गोष्ट नाकारतां येण्यासारखी नाहीं. काँग्रेसच्या निस्सीम भक्तांनाहि याची जाणीव होऊं लागलेली आहे. देशांतील अव्वल दर्जाचे नेते काँग्रेसच्या ध्वजाखालीं आहेत आणि दुसरा कोणताहि पक्ष काँग्रेसइतका संघटित नाहीं, यामुळें येत्या निवडणुकींत काँग्रेसला मताधिक्य लाभेल या विचारानें हे काँग्रेसचे कार्यकर्ते आपल्या मनाचें समाधान करून घेण्याचा प्रयत्न करीत आहेत. परंतु ज्या संघटनेनें भूतकाळांत एवढें उज्ज्वल कार्य केलें, तिच्या दृष्टीनें हें समाधान फोल आहे आणि म्हणूनच चालू परिस्थितीला जबाबदार असलेल्या कारणांची छाननी करणें आवश्यक झालें आहे.

### झांकलेल्या उणीवा उघड झाल्या

स्वातंत्र्य मिळेपर्यंतच्या काळांत काँग्रेस-संघटनेंतला कमजोरपणा दोन बलिष्ठ गोष्टींनीं झांकला गेला होता. त्यांपैकीं पहिली गोष्ट म्हणजे म. गांधींचें थोर नेतृत्व. भारतांतील जनतेची गांधीजींच्या नेतृत्वावर संपूर्ण श्रद्धा होती. बहुजनसमाजानें इतक्या मोठ्या प्रमाणावर ज्यांचें अनुयायित्व पत्करलें आहे, असा पुढारी देशामध्यें क्वचितच निर्माण होतो. जोंवर म. गांधी म्हणजेच काँग्रेस असें समीकरण होतें, तोंवर संघटनेंतल्या कोणत्याहि वैगुण्यानें बहुजनसमाज तिच्यापासून दूरावण्याचा संभव नव्हता. याचा अर्थ वैगुण्यें नव्हतीं असा नाहीं; परंतु तीं स्पष्टपणें दिसूं लागलीं नव्हतीं आणि बाहेरच्या लोकांना कळून येण्यासारखीं नव्हतीं. दुसरी गोष्ट म्हणजे काँग्रेसनें देशाच्या स्वातंत्र्यासाठीं चालवलेला लढा. या उच्च ध्येयानें झुंजणारी अशी काँग्रेस हीच एकुलती एक संघटना होती. तेव्हां स्वातंत्र्य मिळवण्याच्या सामायिक उद्देशानें प्रेरित झालेले वेगवेगळे गट या संघटनेंत दाखल झाले. जोंवर काँग्रेसला सामायिक शत्रूला एकवटून तोंड द्यावयाचें होतें, तोंवर या विविध गटांचीं भिन्न भिन्न मतें आणि आपापसांतील भांडणें दिसून येत नव्हतीं. त्यामुळें, जरी ही संघटना मूलतःच कमजोर आणि योग्य प्रकारें संघटित नव्हती, तरी वर उल्लेखिलेल्या दोन गोष्टींच्या योगानें काँग्रेसची शक्ति वरवर तरी पुष्कळच दिसत होती. मात्र जेव्हां कसोटीची वेळ आली, तेव्हां या उणीवा अगदीं स्पष्ट झाल्या.

गांधीजी गोलमेज परिषदेहून परत आल्यानंतर ब्रिटिश सरकारशीं दुसरा लढा म्हणून काँग्रेसनें १९३२ मध्यें जी चळवळ केली, ती जरी बहादुरीची ठरली, तरी तिनें एक गोष्ट मात्र स्पष्ट झाली. ती म्हणजे बहुजनसमाजापासून या संघटनेनें ज्या दिव्य त्यागाची अपेक्षा केली, ती फलद्रूप होण्याइतकी बहुजनसमाजाची पकड या संघटनेनें घेतलेली नव्हती. तुरुंग भरून गेले हें खरें, परंतु








सरकारनें नेत्यांना बंदींत टाकल्यानंतर मात्र बहुजन-समाजानें पुढें कांहींच हालचाल केली नाहीं आणि त्यांच्यांत उदासीनता दिसून येऊं लागली. १९४२ मध्येंहि तीच गत झाली. निवडणूक जिंकतां येईल इतकी काँग्रेसची पकड जनतेवर निश्चित होती. परंतु जेव्हां प्रत्यक्ष कार्य करण्याची आणि जीवापाड जपलेल्या कांहीं उद्दिष्टांप्रीत्यर्थ त्याग करण्याची मागणी करण्यांत आली, तेव्हां भारताच्या ग्रामीण विभागांतील जनतेकडून जोरदार आणि सक्रिय कार्य करवून घेण्याइतकी तिची पकड सामर्थ्यवान् नाहीं हें त्या वेळच्या घटनांवरून दिसून आलें. ही गोष्ट खरी कीं दिवसेंदिवस काँग्रेसची चळवळ म्हणजे बहुजन-समाजाची चळवळ होऊं लागली होती. नवे नवे लोक काँग्रेसमध्यें सामील होत होते आणि तिचें कार्य बहुजनसमाजाच्या दिशेनें वाटचाल करूं लागलें होतें. परंतु १९४२ आणि त्यानंतरहि या संघटनेचें स्वरूप पाहिलें तर ही गोष्ट अगदीं स्पष्ट दिसून आली असती कीं, भारताच्या बहुजनसमाजाचे जे विविध थर आहेत, त्यांतल्या अगदीं वरच्या गटांतलेच लोक या संघटनेंत भाग घेत आहेत.

## काँग्रेसचें ध्येय व भूमिका हीं अस्पष्ट

स्वातंत्र्य मिळाल्यानंतर तर, त्या एकमेव उद्देशानें झालेल्या एकोप्याचें मूळ कारणच नाहींसें झालें. जोंवर गांधीजी होते, तोंवर काँग्रेसला बहुजन-समाजाचा पाठिंबा मिळत राहील अशी खात्रीच होती, पण त्यांच्या मृत्यूनंतर काँग्रेस-संघटना खरीखुरी पोरकी झाली आणि आतां तर या संघटनेचें सत्य स्वरूप उघडपणें दिसून येऊं लागलें आहे. सत्तेसाठीं वेगवेगळ्या गटांमध्यें चाललेल्या स्पर्धा येन केन प्रकारेण काँग्रेस-संघटना आणि सत्ता स्वतः-च्या काबूंत ठेवण्यासाठीं सुरूं असलेल्या खटपटी, आणि नीति, सत्य आणि प्रामाणिकपणा यांचा अभाव हीं पावें संघटनेमध्यें शिरूं लागलीं. अर्थात-तच हे दोष एकट्या काँग्रेस-संघटनेंतच आहेत असें नाहीं. कोणत्याहि बहुजनसमाजाच्या मोठ्या संघटनेंत हे दोष मूळचेच असतात असें या बाबतींत म्हणतां येण्यासारखें आहे आणि त्यांत कांहीं अंशीं तथ्यहि आहे. परंतु काँग्रेस-संघटनेंतल्या कांहीं तत्त्वांची निश्चित कल्पना न ठरल्यामुळेंच परिस्थिति बिघडली आहे आणि म्हणूनच आज काँग्रेस बहुजनसमाजाची खरीखुरी संघटना होण्याच्या मार्गांत अडथळे येत आहेत.

१९४७ पर्यंत स्वातंत्र्यप्राप्ति हेंच भारतीय राष्ट्रीय काँग्रेसचें उद्दिष्ट होतें. तें एकदां प्राप्त झाल्यानंतर कित्येक लोकांच्या मनांत खरोखरच तिच्या भावी ध्येयांबद्दल शंका उपस्थित झाली. या बाबतींत पुष्कळांना कित्येक अस्पष्ट कल्पना होत्या; परंतु फारच थोड्या लोकांना या कल्पनांचें निश्चित स्वरूप समजूं लागलें होतें. आपल्या पक्षाची ध्येयप्रणाली सर्व सभासदांना पूर्णपणें माहीत नसणें हा दोष अनेक राजकीय पक्षांत दिसून येतो. समाजवादी पक्षाच्या कित्येक सभासदांना पक्षाच्या धोरणाची निश्चित माहिती नाहीं असें आपल्याला आढळून आल्याचा अनुभव श्री. जयप्रकाश नारायण यांनीं नुकताच मद्रासमध्यें निवेदन केला. कशाहि रीतीनें कां होईना, परंतु शेतकऱ्यांचा आणि कामगारांचा कैवार घेणारा पक्ष म्हणून ओळखल्या जाणाऱ्या पक्षाच्या बाबतींत ही गोष्ट फारशी महत्त्वाची नाहीं. परंतु जर एखाद्या पक्षावर तो पक्ष भांडवलदारांच्या बाजूचा आहे किंवा निदानपक्षीं त्यांचें साहाय्य घेऊन भारताचें भवितव्य ठरण्याचा प्रयत्न करीत आहे असा—कदाचित् निष्कारणहि—आरोप करण्यांत येत असेल तर त्या पक्षाच्या बाबतींत मात्र या गोष्टीला विशेष महत्त्व आहे. काँग्रेसच्या कोणत्याहि साधारण कार्यकर्त्याला काँग्रेसचें सध्यांचें उद्दिष्ट आणि चालू भारतीय परिस्थितींतील तिची भूमिका यांबद्दल प्रश्न विचारला तर बिनचूक उत्तर मिळणें कठिण आहे. जर तुम्ही त्याला आणखी प्रश्न केलांत कीं, "बाबारे, कामगार आणि किसान यांच्या हितसंबंधांचें रक्षण करणें हें काँग्रेसचें ध्येय आहे काय? आणि तसें असेल, तर समाजवादी पक्ष आणि काँग्रेस यांमध्यें काय फरक आहे?" तर तो अगदीं गोंधळून जाईल. स्वातंत्र्य मिळाल्यानंतरच्या काळांत ऐक्य आणि स्थैर्य प्रस्थापित करणारी संस्था ही काँग्रेसची भूमिका सर्वांना माहीत आहे. परंतु राष्ट्रीय जीवनाच्या सर्व विभागांत आर्थिक आणि राजकीय न्याय मिळवून







देणारी समाजव्यवस्था काँग्रेस कोणत्या रीतीनें निर्माण करणार तें मात्र तितकेसें स्पष्ट झालेलें नाहीं.

## आर्थिक आणि राजकीय न्याय कसा देणार ?

सध्यां सगळ्याच पक्षांना गरीबांची स्थिति सुधारण्याची भाषा बोलावी लागते. तें चालू युगाचें लक्षण आहे. त्याशिवाय कोणत्याहि पक्षाला कार्य करतांच यावयाचें नाहीं. 'शेतकरी आणि कामगार यांना इतरांबरोबरचे हक्क देणारी नवी समाजव्यवस्था लोकशाही पद्धतीनें अस्तित्वांत येणेंच शक्य नाहीं' असें ~~उग्र~~ साम्यवादी म्हणाले, तर तें समजण्यासारखें आहे. परंतु समाजवादी पक्ष प्रतिपादीत असलेला लोकशाही समाजवाद आणि काँग्रेसनें योजिलेली समाजरचनेची लोकशाही स्वरूपाची प्रगति यांच्यामधील फरक सहजगत्या समजून येण्याजोगा नाहीं. काँग्रेसचा वर्गयुद्धावर विश्वास नाहीं, समाजवादी पक्षाचा त्यावर विश्वास आहे. परंतु अशी जरी स्थिति असली, तरी जोंवर कोणताहि पक्ष निवडणुकींतील मतदानाचा कौल मानायला तयार आहे, तोंवर या फरकाला फारसें महत्त्व उरत नाहीं. एखाद्या संघटनेची उभारणी द्वेषाच्या पायावर केली, तर तिची स्थापना आणि विकास सहजगत्या शक्य होतात, ही गोष्ट मागील इतिहासानें दाखवून दिली आहे. मुस्लीम लीग ही अशा प्रकारची संघटना होती. काँग्रेसमार्फत गांधीजींनीं जरी कित्येक उच्च ध्येयें प्रतिपादिलीं असलीं, तरी कांहीं अंशीं तिची ही उभारणी ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या द्वेषावरच झाली होती. याच दृष्टीनें पाहतां असेंहि म्हणतां येईल, कीं श्रीमंत लोकांचें त्यांच्या संमतीनें विसर्जन करण्याचा उद्देश बाळगणाऱ्या एकाद्या संस्थेपेक्षां श्रीमंतांच्या द्वेषावर उभारलेल्या संघटनेची शक्ति आणि मजबूतपणा अधिक रहाण्याचा संभव आहे. काँग्रेस पक्षाचे निरनिराळे पुढारी जीं परस्परभिन्न मतें प्रतिपादितात, त्यामुळें दुर्दैवानें परिस्थिति अधिकच गोंधळाची झाली आहे. त्यामुळें काँग्रेसच्या सर्वसाधारण सभासदाला बावचळल्यासारखें होत आहे. कांहींचा विश्वास मोठाल्या उद्योगधंद्यांवर आहे, कांहींची समाजवादावर श्रद्धा आहे, कांहींजणांना गांधीजींच्या विधायक कार्यक्रमाबद्दल निष्ठा वाटत असून, ग्रामोद्योग आणि विकेंद्रीकरण यावर त्यांचा विश्वास आहे, तर कांहीं जणांचीं मतें त्याच्या सर्वस्वीं विरुद्ध आहेत. तेव्हां जर काँग्रेसला बहुजनसमाजाचा पाठिंबा असलेला बलिष्ठ राजकीय पक्ष म्हणून कार्य करायचें असेल, तर तिनें सध्यांच्या परिस्थितींत आपली निश्चित भूमिका काय आहे हें स्पष्टपणें दाखवून देणें जरूरीचें आहे. सामाजिक आणि आर्थिक न्याय मिळेल अशी समाजरचना आपण भारतामध्यें कोणत्या रीतीनें निर्माण करणार आहोंत आणि इतर पक्षांपेक्षां आपण कोणत्या बाबतींत निराळे आहोंत हें काँग्रेसनें स्पष्ट केलें पाहिजे. सर्वसामान्य कार्यकर्त्यालाहि या भूमिकेची पुरी माहिती झाल्याखेरीज आणि त्याची त्यावर श्रद्धा बसल्याखेरीज, काँग्रेस पक्षाला मिळालेला बहुजनसमाजाचा पाठिंबा टिकून रहाणार नाहीं. तसेंच काँग्रेसच्या या उद्दिष्टांपासून सामान्य कार्यकर्त्याला आणि जनतेला स्फूर्ति मिळाली पाहिजे आणि तदनुसार कार्य करावेंसें वाटलें पाहिजे. स्वराज्याच्या ध्येयाऐवजीं त्याच्या जागीं काँग्रेसनें नवें ध्येय शोधून काढलें पाहिजे. स्वराज्य हें एक स्फूर्तिदायक ध्येय होतें, त्यासाठीं झगडावें आणि त्याग करावा अशी जनतेची भावना होण्यासारखें तें ध्येय होतें. तेव्हां जनतेला उत्साह लाभेल, अधिक लोक संघटनेंत सामील होतील आणि संघटनेचा प्रसार भारताच्या कानाकोपऱ्यांतहि होईल असें दुसरें एखादें तितकेंच प्रभावशाली ध्येय काँग्रेसनें शोधून काढणें अगत्याचें आहे. Co-operative Commonwealth चें, 'सहकार्याधिष्ठित सर्वोदया' चें ध्येय आणि त्या ध्येयापर्यंत पोहोंचण्याचा रस्ता यांचें स्वरूप खुलासेवार जनतेपुढें मांडण्यांत आलें पाहिजे तरच काँग्रेसचें संध्याचें उद्दिष्ट सर्वांना सुस्पष्ट होऊं शकेल.

## काँग्रेस आणि विधायक कार्यकर्ते

ध्येयांच्या या स्पष्टीकरणाच्या बाबतींत, विधायक कार्यकर्त्यांचा गट आणि काँग्रेस संघटनेंतील इतर लोक यांच्यामधील मतभेद एक तर सोडविण्यांत आले पाहिजेत किंवा त्यांची एकमेकांपासून फारकत केली पाहिजे. बहुजनसमाजाची स्थिति सुधारण्याचा सर्वंकष कार्यक्रम मान्य करावयाच्या कामांत जीं अनेक कारणें अडथळा आणीत आहेत, त्यांपैकीं हें एक आहे. आतांपर्यंत अनेक प्रसिद्ध व्यक्तींनीं या परि-

स्थितीबाबत आपआपलीं मतें थोड्याफार अंशानें व्यक्त केलीं आहेत; परंतु या अडचणींचें निराकरण करण्याची कांहींच उपाययोजना झालेली नाहीं. विधायक कार्यकर्त्यांना वाटतें कीं, मंत्रिमंडळांची विधायक कार्यक्रमावर श्रद्धा नाहीं. उलट मंत्रि-मंडळांना वाटतें कीं, विधायक कार्यकर्ते निव्वळ ध्येयपूर्ण दृष्टिकोन मांडीत आहेत, परंतु हा दृष्टिकोन प्रत्यक्षांत आणणें अशक्य आहे. याचा परिणाम मात्र हा झगडा असाच चालूं रहाण्यांत झाला आहे. विधायक कार्यकर्ते आतांपर्यंत काँग्रेसला पाठिंबा देत आलेले आहेत, आणि आज काँग्रेसला बहुजन-समाजांत जी लोकप्रियता आहे, ती बऱ्याच अंशीं त्यांच्या पाठिंब्यामुळें मिळालेली आहे, ही गोष्ट खरी आहे. तेव्हां ध्येयांच्या स्पष्टीकरणाच्या दृष्टीनें पाहतां हा प्रश्न कायमचा निकालांत काढण्याची आवश्यकता आहे. विधायक कार्यकर्त्यांच्या मतें कापडगिरण्यांचा धंदा अनिष्ट असून, त्याचें जितक्या जलदीनें उच्चाटन होईल तितकें बरें. उलट सरकार या धंद्याला शक्य तितक्या भक्कम पायावर उभारण्याचा प्रयत्न करीत आहे. या असल्या विसंगतीमुळें एक प्रकारच्या अवास्तवतेचें वातावरण निर्माण होतें आणि ही गोष्ट जोरदार कार्यक्रम ठर-विण्याच्या आणि त्याच्या अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीनें इष्ट ठरत नाहीं.

जनतेला उत्साह वाटेल आणि तिचा मनःपूर्वक पाठिंबा मिळेल असा जर कार्यक्रम आंखावयाचा असेल, तर त्यांत लोकांपुढील चालू अडचणीं-विरुद्ध मोहीम काढली पाहिजे आणि त्यांचें निरा-करण केलें पाहिजे. तसेंच त्यामुळें देशांतील शेतकी आणि औद्योगिक क्षेत्रांतील उत्पादनांत भर पडावयाला मदत झाली पाहिजे. तेव्हां ग्रामीण विकासाची कोणतीहि योजना आंखावयाची झाली, तर त्यांत शेतकी आणि सहकार्य ( सहकारी चळवळ ) यांचा अंतर्भाव करायलाच हवा. परंतु विधायक कार्यक्रमांत ग्रामोद्योग आणि ग्रामविकासाचे आणखी कांहीं प्रश्न यांच्यावर अधिक जोर देण्यांत आला असून, शेतकी आणि सहकारी चळवळ या दोन अंगांना जवळजवळ डावलण्यांत आलें आहे. तेव्हां नवा कार्यक्रम ठरवितांना भूतकाळांतील ही चूक दुरुस्त केली पाहिजे.

### मंत्रिमंडळें आणि काँग्रेससंघटना

तेव्हां आतां एकाद्या योजलेल्या कार्यक्रमाची जरूरी आहे. स्वातंत्र्य मिळाल्यामुळें काँग्रेसचें अत्यंत महत्त्वाचें कार्यक्षेत्रच हिरावल्यासारखें झालें आहे. सध्यां काँग्रेस-समित्यांपुढें करायला कांहीं कार्यच नाहीं ही स्थिति पाहून वाईट वाटतें. पूर्वीच्या काळांत ब्रिटिश सरकारशीं झगडे करावे लागल्या-मुळें या काँग्रेस-समित्यांना पुष्कळसें कार्य वारंवार करावें लागे आणि त्यांच्यामधें निष्क्रियता रहात नसे. चळवळींच्या दरम्यानच्या काळांत एक प्रका-रचें शैथिल्याचें वातावरण यायचें आणि काँग्रेसची शक्ति कमी झाल्यासारखी वाटायची ही गोष्ट खरी; परंतु त्यानंतरच्या चळवळींत पुन्हां तिच्यामध्यें अधिक सामर्थ्य यावयाचें आणि मधल्या स्थितीची भरपाई होऊन जावयाची. काँग्रेसनें सतत कार्य करीत रहावें म्हणून गांधीजींनीं विधायक कार्यक्रमाची योजना केली होती ही गोष्ट खरी. परंतु विधायक कार्यक्रम ही बाब बहुतेक विधायक कार्यकर्त्यांचीच मक्तेदारी होऊन बसली. सर्वसामान्य काँग्रेस-कार्यकर्ता विधायक कार्यक्रमाबद्दल नुसती सहानुभूति दाखवाव-याचा आणि या बाबतींतलें आपलें औदासीन्य पुढील चळवळींत तुरुंगांत जाऊन भरून काढावयाचा. त्याचा परिणाम असा झाला कीं, काँग्रेसनें प्रादेशिक सत्तेचा स्वीकार केल्यानंतर काँग्रेस-समित्यांपुढें कांहीं कार्यक्रमच राहिला नाहीं. सर्व विकास-योजनांची अंमलबजावणी सरकार करूं लागलें आणि काँग्रेस-संघटनेला अलग पडल्यासारखें वाटूं लागलें. खरें पाहिलें, तर ग्रामीण विकासाचा हा प्रचंड कार्यक्रम अंमलांत आणण्याच्या कामीं काँग्रेस संघटनेनें सर-कारशीं सहकार्य करावयाला पाहिजे. परंतु सध्यांच्या काळांत काँग्रेस-सरकारें आणि काँग्रेस-संघटना एक-वटून काम करूं शकत नाहींत असा मन अस्वस्थ करणारा प्रत्यक्ष देखावा दिसत आहे, भावी इतिहासकार याचा निर्देश केल्याशिवाय रहाणार नाहींत. एक तर मंत्रिमंडळें आणि संघटना एक-मेकांशीं भांडत तरी आहेत, किंवा कांहीं थोड्या ठिकाणीं काँग्रेस-संघटना मंत्रिमंडळांपेक्षां गौण स्थान










अनुक्रमणिका

स्वीकारीत आहेत असा देखावा दिसून येत. आहे. कॉंग्रेस-संघटनांनीं गौणत्व स्वीकारलें म्हणजे मग कार्य करावयाची त्यांची धडाडी आणि मौलिकताच गमावल्यासारखें होतें. कॉंग्रेस संघटना आणि मंत्रि-मंडळ यांच्यांतले संबंध एकाच उद्देशानें प्रयत्न आणि सहकार्य करण्याच्या स्वरूपाचे असले पाहिजेत. त्यांच्यापैकीं कोणीहि दुय्यम ठरतां कामा नये आणि प्रत्येकानें आपापल्या क्षेत्रांत स्वतंत्र राहिलें पाहिजे. सरकारनें योजिलेल्या कार्यक्रमाची अंमलबजावणी मंत्रिमंडळानें आपल्या नोकरवर्गामार्फत केली पाहिजे आणि कॉंग्रेसनें बिनसरकारी प्रयत्नांची संघटना करून या कार्यक्रमाला मदत केली पाहिजे. कॉंग्रेसचा एक कार्यक्रम आणि मंत्रिमंडळाचा दुसरा कार्यक्रम असें असतांच कामा नये. परंतु दुर्दैवानें असें झालें आहे कीं, कॉंग्रेस-संघटना मंत्रिमंडळाच्या कार्यात ढवळाढवळ तरी करण्याचा प्रयत्न करीत आहेत किंवा मंत्रिमंडळें तरी कॉंग्रेस-संघटनांना आपलें स्वतंत्र कार्य करणें अशक्य व्हावें अशा रीतीनें त्यांच्यावर आपली पकड बसविण्याचा प्रयत्न करीत आहेत. या प्रयत्नांमुळेंच जीं भांडणें होत आहेत, त्यांमुळें जनतेला कॉंग्रेस-संघटनेबद्दल वाटणारा जिव्हाळा कमी झाला आहे. तेव्हां कॉंग्रेस-संघटना आणि मंत्रिमंडळें यांच्यामध्यें अधिक सहकार्य आणि समजूतदारपणा येण्याच्या दृष्टीनें, लोकशाही सरकार असलेल्या देशांच्या कारभार-व्यवस्थांचा अभ्यास करणें इष्ट होईल. त्या देशांमध्यें कारभाराच्या सर्व अवस्थांमध्यें सरकार आणि पक्ष-संघटना यांच्यांतील संबंध कसे आहेत तें पाहून त्या दृष्टीनें कांहीं परंपरा घालून देणें आणि कार्यक्षेत्रें निश्चित ठरविणें अगत्याचें आहे.

## कारभारव्यवस्थेंतील उणीवा

सध्यां आपला कारभार करणारा जो नोकरवर्ग मिळाला आहे, त्याची संघटना आणि शिक्षण कांहीं विशिष्ट हेतूनें झालें असल्यांमुळें हा प्रश्न आणखी बिकट होऊन बसला आहे. कारभारव्यवस्था चालू ठेवणें एवढी एकच अपेक्षा त्याच्यापासून करण्यांत येत होती. थोड्या वेळांत अचंबा वाटण्याइतकी फल-निष्पत्ति करून दाखविणारे सेवाधर्माचे लोक या दृष्टीनें त्यांच्याकडे कधींच पहाण्यांत आलें नव्हतें, किंबहुना अशा वृत्तीचा एकादा माणूस या नोकर-वर्गांत शिरला तर त्याची अयोग्य म्हणून उचल-बांगडी व्हावयाची असेंच या नोकरवर्गाच्या इति-हासावरून दिसून येतें. गैरसमज टाळण्याकरितां प्रथमच सांगितलें पाहिजे कीं या नोकरवर्गांतील लोकांच्या लायकीबद्दल मी शंका उपस्थित करीत नाहीं. भारतांतले अव्वल दर्जाचे लोक या नोकरवर्गांत आहेत ही गोष्ट खरी. परंतु त्याचबरोबर हेंहि कबूल करायला पाहिजे कीं, या नोकरवर्गाची संघटना आणि परंपरा लक्षांत घेतां, जलदीनें आणि मोठ्या प्रमाणावर फलनिष्पत्ति व्हावयाला या नोकरवर्गाचा उपयोग होण्यासारखा नाहीं. आज-वरच्या परंपरेचे परिणाम नाहींसे व्हावयाला कांहीं वेळ जाऊं दिला पाहिजे. असा इष्ट फरक कांहीं कांही अंशीं आतां दिसूं लागला आहे हेंहि खरें आहे. परंतु या नोकरवर्गांत आपण होऊन कार्य कर-ण्याची आणि जबाबदारीची वृत्ति बाणल्याशिवाय दूरगामी परिणाम दिसून येणें कठिण आहे. स्थानिक आणि वैयक्तिक जबाबदाऱ्यांची जाणीव जागती ठेवण्याच्या दृष्टीनें जर एकाद्या कारभारव्यवस्थेनें कार्य केलें नाहीं, तर लोकप्रिय सरकारला अत्यंत आवश्यक असा आशेचा, उत्साहाचा आणि कार्य-प्रवणतेचा मूळ झराच नाहींसा केल्यासारखें होईल आणि लोकशाही संस्कृतीला मोहर येणार नाहीं. या दृष्टीनें पाहतां आपली आजची कारभारव्यवस्था या मानदंडाला पुष्कळच तोकडी पडत आहे. स्थानिक आणि वैयक्तिक जबाबदाऱ्यांची जाणीव जवळजवळ दिसून येत नाहींच, आणि जबाबदाऱ्या अंगावर टाकल्यानंतर जी वैयक्तिक कार्यप्रवणता निर्माण होते, तिला तर मुळींच वाव नाहीं. याचा परिणाम असा झाला आहे, कीं जनतेला सरकारचे दिरंगा-ईचें धोरण अजिबात पसंत पडेनासें झालें आहे, आणि तिचा सरकारच्या कार्यक्षमतेवरील आणि परिणामकारकतेवरील विश्वास हलकें हलकें ढांसळूं लागला आहे.

## विकेन्द्रीकरण झालें नाहीं

कित्येक वेळां कळकळ असलेले परंतु जबाब-दारीची जाणीव तितकीशी नसलेले कायदेमंडळांतील कांहीं सभासद आणि कॉंग्रेस-कार्यकर्ते लोकांना असें





अनुक्रमणिका

सांगतात कीं, आम्ही तुमचीं गाऱ्हाणीं सरकारच्या नजरेला आणतों, पण सरकार त्यांचें निराकरण करूं शकत नाहीं. या त्यांच्या जाहीर प्रचारानें तर परिस्थिति आणखीच बिघडते. या तथाकथित गाऱ्हाण्यांची जर छाननी केली, तर असें दिसून येतें कीं, त्या विशिष्ट सभासदाला एखाद्या प्रश्नाबाबत जसा निर्णय पाहिजे असेल तसा तो मिळालेला तरी नसतो आणि म्हणून प्रश्न उपस्थित होतो किंवा साऱ्या देशांतच मालाचा तुटवडा असतांना, तो एकाद्या स्थळीं कां पोंचला नाहीं याबद्दल तरी गाऱ्हाणें गाइलें जातें. खरें बोलायचें झालें, तर ही गोष्ट कबूल करावयाला हवी कीं, कित्येक प्रसंगीं सरकारच्या कार्यक्षमतेच्या अभावामुळें हीं गाऱ्हाणीं उपस्थित झालेलीं असतात. सरकारनें विकेंद्रीकरण न केल्यामुळें हा कार्यक्षमतेचा अभाव निर्माण झालेला असतो. विकेंद्रीकरणाचा कैवार घेऊन काँग्रेसनें एके काळीं त्याचा आग्रह धरला होता. परंतु सध्यां तरी प्रादेशिक कारभारव्यवस्थेमध्यें हें तत्त्व अंमलांत आणण्याच्या बाबतींत काँग्रेस-सरकारांना लक्षांत येण्याजोगें यश आलेलें नाहीं ही दुर्दैवाची गोष्ट आहे. सरकारी धोरणाच्या अंमलबजावणीच्या कामीं जनतेचें सहकार्य मिळवितां न येणें, आणि जनतेच्या गरजा भागविण्याच्या दृष्टीनें बव्हंशीं केंद्रीभूत झालेली कारभारव्यवस्था असमर्थ ठरणें—या दोन कारणांमुळें काँग्रेस-सरकारें आणि काँग्रेस-संघटना जनतेच्या मर्जींतून हलके हलके उतरूं लागलीं आहेत. तेव्हां आतां असा एकादा कार्यक्रम ठरविला पाहिजे कीं ज्याच्या अंमलबजावणीच्या विविध अवस्थांमध्यें सर्वांना पुरेसा भाग घेतां येईल, ज्याच्यामुळें लोक पुन्हां काँग्रेसच्या झेंड्याखालीं एकत्र जमूं शकतील आणि त्यांचें सध्यांचें आळसाचें आणि बेफिकीरीचें धोरण संपून त्याच्या जागीं उत्साहाचें, कार्यप्रवणतेचें आणि भविष्यकाळांत आशा वाटण्यासारखें धोरण आणतां येईल. तसेंच सध्यांच्या नोकरवर्गाची नव्या रीतीनें संघटना केली पाहिजे, आणि स्थानिक जबाबदारी आणि कार्यप्रवणता वाढीला लागेल अशा रीतीच्या कार्यक्रमाची अंमलबजावणी त्यांच्याकडून करून घेतली पाहिजे.

काँग्रेसचे अव्वल दर्जाचे पुढारी देशाचा कारभार चालवीत आहेत आणि त्यांना काँग्रेस-संघटनेच्या प्रश्नांकडे लक्ष द्यायला पुरेसा वेळ नाहीं, हेंहि काँग्रेसची संघटना कमजोर होण्याचें एक कारण आहे. सर्व प्रदेशांत काँग्रेसमधील प्रमुख लोक मंत्रिमंडळांत गेले असून, काँग्रेस-संघटना दुय्यम आणि तिय्यम दर्जाच्या लोकांच्या हातीं गेली आहे आणि तिच्या संघटनात्मक बाजूकडे सर्वस्वीं दुर्लक्ष होत आहे. याचा अप्रत्यक्ष परिणाम असा झाला आहे कीं संघटनेमध्यें गट पडूं लागले आहेत आणि संघटनेच्या हितापेक्षां स्वतःच्या हिताच्या दृष्टीनें सत्ता केंद्रित करणाऱ्या लोकांच्या हातांत सूत्रें गेलीं आहेत. तेव्हां काँग्रेसच्या कांहीं अव्वल दर्जाच्या पुढाऱ्यांनीं काँग्रेसकडे लक्ष पुरवावें आणि विरोधी गटांना तोंड देऊं शकेल अशी काँग्रेसची सामर्थ्यवान् संघटना निर्माण करावी ही गोष्ट अत्यावश्यक आहे. प्रादेशिक सरकारें आणि प्रादेशिक काँग्रेस-समित्या, तसेंच मध्यवर्ती सरकार आणि कार्यकारी समिति यांच्या संबंधामध्येंहि हाच न्याय लागू आहे. काँग्रेस-सरकार आणि काँग्रेस-संघटना यांनीं आपण परस्परांवर अवलंबून आहोंत ही गोष्ट ओळखून मान्य केली नाहीं, तर काँग्रेस आजवर सध्यांच्या अवस्थेला ज्या शिडीच्या साहाय्यानें पोंचली, ती शिडीच लाथेनें ठोकरल्यासारखें होईल.

---

अनुक्रमणिका

श्री. जे. सी. कु मा रा प्पा

# शेत-मजुरांची संघटना

* राजकीय सत्ता हस्तगत करण्याच्या हेतूनें देशांतील निरनिराळे राजकीय पक्ष किसानांची संघटना करण्याचा, त्यांचा विश्वास संपादन करण्याचा ईर्ष्येनें प्रयत्न करीत आहेत. कांहीं पक्ष. किसानांना इतकीं भरमसाट आश्वासनें देत असतात कीं त्यांवरून पाहतां किसानांकरितां जणूं पृथ्वीवर नंदनवनच अवतरणार आहे, असें वाटतें. याउलट इतर दुसरे पक्ष, अन्यायनिवारणार्थ 'प्रत्यक्ष कृति'–(direct action)-च श्रेयस्कर, असें सांगून किसानांना समाजविघातक चळवळी करण्यास भडकवीत आहेत. या सर्व पक्षांमध्यें जे अत्यंत समजूतदार म्हणून गणले जातात ते देखील, औद्योगिक विभागांतून मजूर-चळवळी ज्या पद्धतीनें संघटित करतात, त्याच पद्धतीचें अवलंबन किसानांची संघटना करण्याकरितां करूं पाहातात. औद्योगिक क्षेत्रांत मजूर-संघटना किंवा लेबर युनिअन कितीहि उपयोगी असली, तरी तीच पद्धति किसानांची संघटना करण्यास उपयोगी पडेल असें नाहीं.

कारखान्यांतील गिरण-मजुरांची गोष्ट निराळी असते. जरी हे मजूर मूळचे खेडेगांवांतूनच आलेले असले, तरी शहरांत आल्यावर त्यांच्या मूळच्या संवयी बदलतात, त्यांच्या राहाणीचें मूळ कानेकोपरे घासले जाऊन, ते सर्व एकसारखे बनतात ! सर्व प्रकारच्या लोकांशीं ते मिसळतात, एकाच कारखानदाराच्या कारखान्यांत एका छपराखालीं काम करतात. त्यांची ऐकमेकांची जानपछान होते. एकासारखा दुसरा बनून कारखान्यांतील मजुरांचा एकजिनसी समाज बनूं शकतो. त्यांच्यांत एकी उत्पन्न होऊन कारखानदाराविरुद्ध अभेद्य संघटना ते करूं शकतात. शेतमजुरांपेक्षां गिरणमजुरांना, वेळ पडल्यास, आर्थिक दृष्ट्या टिकाव धरून राहण्याची शक्ति अधिक असते. म्हणून तुलनेनें पहातां, कारखान्यांतील मजुरांची संघटना करणें हें शेतकाम करणाऱ्या मजुरांची संघटना करण्यापेक्षां सोपें आहे.

शेतीवर काम करणारे मजूर हे इतस्ततः विखुरलेले, विस्कळित आणि अज्ञानी असून त्यांच्यांत एकीचा अभाव असतो. वेळप्रसंगीं बेकारींत टिकाव धरून रहाण्याइतकें त्यांच्याजवळ पैसेहि नसतात. हे शेतकामावरील मजूर एकेक किंवा कांहींजण मिळून अनेक मालकांकरितां राबत असतात. अशाप्रकारें शेतावर राबणाऱ्या मजुरांचा हा वर्ग अठरापगड, विस्कळित, संकीर्ण असतो. अशा विस्कळित मजुरवर्गांची बलाढ्य जमीनदारांविरुद्ध संघटना करून शेतीविषयक सुधारणा करूं पहाणें ही आशा व्यर्थ होय. असा जर आपण प्रयत्न करावयाला लागलों तर तें मोडक्या काठीचाच आधार घेतल्यासारखें होणार आहे !

पण आपणांजवळ एक परिणामकारक उपाय आहे. देशांत असा एक तिसरा पक्ष आहे, कीं जो कारखान्यांतून होणाऱ्या कामाविषयीं नाहीं इतका शेतीविषयीं जागरूक आहे. हा तिसरा पक्ष म्हणजे शेतमालावर अवलंबून राहाणारी देशांतील जनता होय. किसानसंघटना जर बळकट करावयाची असेल, तर कार्य-

[ पुढील मजकूर पान १५ वर पहावा. ]

* 'नवभारता' करितां मूळ इंग्रजींत लिहिलेल्या लेखाचा हा अनुवाद आहे. —का. सं.





अनुक्रमणिका

श्री. बाळुभाई मेहता

# सर्वोदय-कार्यकर्त्यांचें एक नमुनेदार शिबिर

महात्मा गांधींचा खून झाल्यावर देशांतील विविध संस्था आणि व्यक्ती ह्यांनीं आपआपल्या कुवतीप्रमाणें विचार करून आपल्याला प्रिय असलेल्या कोणत्या ना कोणत्या तरी स्वरूपांत त्यांचें स्मारक करावें असें ठरविलें. अशा रीतीनें त्यांच्या स्मारकाच्या निरनिराळ्या योजना पुढें आल्या.

महात्मा गांधींचे अनुयायीहि सेवाग्रामला एकत्र जमले आणि त्यांनीं गांधींजीच्या स्मारकासंबंधीं एक अभिनव योजना देशापुढें मांडली. ही योजना म्हणजे महात्माजींच्या आवडत्या अशा 'सर्वोदय' विचारसरणीचा प्रसार करणें होय.

देशांतील इतर संस्थांप्रमाणें मुंबईच्या कॉंग्रेस-सरकारनेंहि गांधीजींच्या स्मारकासंबंधीं कांहीं गोष्टी करण्याचें योजिलें होतें. गांधीजी १९१५ सालीं दक्षिण आफ्रिकेंतून परत आले तेव्हां ते प्रथम अहमदाबाद–शहरानजीक 'कोचरब' नांवाच्या खेड्यांत आश्रम स्थापून राहिले होते. आणि १९३२ पर्यंत ते जेव्हां मुंबईला येत तेव्हां ते बहुधा 'गांवदेवी'जवळ लॅबर्नम रोडवरील डॉ. प्राणजीवनदास मेहता यांच्या 'मणिभुवन' नांवाच्या बंगल्यांत उतरत असत. तेव्हां तें आश्रम स्थान आणि हा बंगला हीं दोन्हीं खरेदी करण्याचा सरकार विचार करीत आहेच; परंतु ह्याशिवाय 'सर्वोदय' म्हणजे 'अंत्योदय' असल्यानें राज्यांतील मागसलेल्या लोकांच्या सर्वांगीण विकासासाठीं आपण एखादी विशिष्ट योजना तयार करावी असें मुंबई सरकारनें ठरविलें. ही योजना 'सर्वोदया'च्या विचारसरणीला पोषक अशीच आहे. ही 'सर्वोदय योजना' म्हणजे मुंबई सरकारचें महात्मा गांधींचें स्मारक होय.

ह्याप्रमाणें सरकारनें प्रत्येक जिल्ह्यांत ज्या ज्या टापूंत भिल्ल, वारली, मावची, कोंकणी, कोळी वगैरे आदिवासी लोकांची वस्ती आहे तो भाग आणि ज्या जिल्ह्यांत असे मागसलेले लोक नाहींत, परंतु मागसलेला प्रदेश आहे तो, असे निवडण्यांत आले आणि तेथें 'सर्वोदय' केंद्रें स्थापन करण्याचें निश्चित केलें. हीं केंद्रें चालविण्यासाठीं त्या त्या जिल्ह्यांतील कार्यकर्त्यांची निवड करण्यांत आली; आणि त्यांना 'संचालक' अशी संज्ञा देण्यांत आली.

मुंबई–राज्यामध्यें बडोदें, कोल्हापूर वगैरे संस्थानें विलीन झाल्यामुळें त्या भागांतहि सर्वोदय–केंद्रें उघडण्यांत आलीं आहेत. मुंबई राज्यांत गुजराथ, महाराष्ट्र आणि कर्नाटक असे तीन भाषानिहाय विभाग पडत असून ह्या तीन भागांतून तूर्त एकंदर २२ सर्वोदय-केंद्रें आहेत. भडोच, अहमदनगर आणि नाशिक या जिल्ह्यांत अद्यापि सर्वोदय-केंद्रें स्थापन व्हावयचीं आहेत.

ह्या सर्व केंद्रांचें निरीक्षण, नियंत्रण आणि अंदाजपत्रकें मंजूर करणें वगैरे कार्यासाठीं सरकारनें (१) गृहमंत्री श्री. मुरारजी देसाई, (२) अर्थमंत्री श्री. वैकुंठराय मेहता, (३) विकासमंत्री श्री. मालोजीराव निंबाळकर, (४) श्री. अप्पासाहेब पटवर्धन, रत्नागिरी, (५) श्री. तिमाप्पा नाईक, कारवार, (६) रजिस्ट्रार, को-ऑपरेटिव्ह सोसायट्या आणि (७) चिटणीस, विकासखातें– अशा सात सद्गृहस्थांची एक समिति नेमली आहे. ह्या समितीला मुंबई राज्याची 'सर्वोदय-समिति' असें संबोधण्यांत येतें.

सर्वोदय-योजनेचीं विविध कामें करण्याकरितां पुष्कळ कार्यकर्ते लागणार आहेत. अशा होतकरू कार्यकर्त्यांच्या शिक्षणाची सोय करण्यासाठीं ह्या समितीनें श्री. अप्पासाहेब पटवर्धन ह्यांच्या अध्यक्षते-खालीं एक पोट-समिति नेमली आहे. ह्या समितीनें गुजराथ, महाराष्ट्र आणि कर्नाटक ह्या तिन्ही विभागांत ' सर्वोदय—ग्रामसेवक—विद्यालयें ' सुरू करावींत असें सुचविलें आहे व त्याप्रमाणें विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. [1]

ह्या पटवर्धन-समितीनें, वरील संस्थांनीं सर्वोदय कार्यकर्त्यांचीं वेळोवेळीं शिबिरें भरवावीं, अशीहि सूचना केली आहे.

ह्या दुसऱ्या सूचनेला अनुसरून वेडछीच्या स्वराज्य-आश्रमाचे आचार्य श्री. जुगतरामभाई ह्यांनी गुजराथेंतील सर्वोदय-केंद्राचे संचालक आणि त्यांचे प्रमुख मदतनीस ह्यांना 'सर्वोदया'ची दृष्टि देण्या-साठीं वेडछी येथें गेल्या मेमध्यें ता. १५ ते २४ पर्यंत दहा दिवसांचें एक शिबिर भरविलें होतें.

ह्या शिबिरामध्यें सर्वोदय-केंद्रांतील कार्यकर्ते ३०, गुजराथेच्या विधायक संस्थांतील कार्यकर्ते १६ आणि खुद्द वेडछी-आश्रमांतील कार्यकर्ते आणि शिक्षक मिळून १६ असे एकंदर ६२ कार्यकर्ते दाखल झाले होते. गुजराथला लागूनच पश्चिम खानदेश जिल्ह्याचें सर्वोदय-केंद्र असल्यानें मलाहि ह्या शिबिरांत दाखल होण्याविषयीं आमंत्रण होतें. आणि त्याप्रमाणें मीहि दहा दिवस हजर होतों.

हें एक नमुनेदार शिबिर होतें. ह्या शिबिराची स्वच्छता, टापटीप, संघटना, शिस्त, वक्तशीरपणा हीं सर्व प्रशंसनीय होतीं. ह्या शिबिराचा कार्यक्रम मोठ्या कुशलतेनें आंखण्यांत आला होता. शिबिराची दिनचर्या खालीलप्रमाणें होती :

सकाळीं : ४–२५ उठणें; ४–४० प्रार्थना; ५॥ ते ६॥ शौचमुखमार्जन; ६॥ ते ७ न्याहारी; ७ ते ९ स्वयंपाक, गांवकाम, सामान्य सफाई, स्नान; ९ ते ११ संमेलन आणि चर्चा; ११। ते १ भोजन, आराम.

दुपारीं : १ ते २ सूत्रयज्ञ; २। ते ४। संमेलन आणि चर्चा; ४। ते ४॥ आराम; ४॥ ते ५॥ चर्चा.

सायंकाळीं : ५॥ ते ६॥ परस्परांशीं ओळख करून घेणें, हिंडणें, फिरणें; ६॥ भोजन; ७॥। ते ८॥। प्रार्थना आणि इतर कार्यक्रम.

ह्या कार्यक्रमाचें सूक्ष्म अवलोकन केलें असतां आपल्याला असें आढळून येईल कीं, जीवनाला आवश्यक अशा सर्व बाबींना योग्य तो वेळ देण्यांत येऊन कार्यकर्त्यांची कार्यक्षमता शाबूत राहील अशी दक्षता घेण्यांत आली होती.

प्रार्थनेच्या कार्यक्रमांतील एक विशेष बाब अशी होती कीं, श्री. जुगतरामभाई एखादा श्लोक, एखाद्या पद्याचें कडवें, एखादी ओळ सांगत आणि त्यावर सर्वांनीं दोन मिनिटें स्तब्ध राहून त्याचें चिंतन करावयाचें असे. प्रार्थनेमध्यें "बापूजींचें जीवनकार्य आमच्यामध्यें अमर राहो" अशा अर्थाचें एक पदहि म्हणण्यांत येई.

' सफाई 'मध्यें आश्रमसफाई, ग्रामसफाई, गोशाळासफाई, संडाससफाई वगैरे प्रकार असत, ह्यामुळें स्वच्छता, शारीरपरिश्रम आणि श्रमप्रतिष्ठा ह्या सर्वांचें महत्त्व कार्यकर्त्यांना पटे.

सकाळची न्याहारी आणि दोन्ही वेळचें भोजन ह्यांमध्यें विविधता ठेवूनहि आहार चौरस राखण्या-बद्दल दक्षता घेण्यांत आली होती. कोणत्या दिवशीं कोणत्या वेळेला न्याहारीचे आणि भोजनाचे पदार्थ कोणते असणार आहेत, हें शिबिर भरविण्याच्या

---

१ ह्या विद्यालयांची कल्पना खालील कोष्टकावरून कळून येईल :

| प्रांत | संस्थेचें नांव | ठिकाण व पत्ता | विद्यार्थ्यांची संख्या |
|---|---|---|---|
| गुजराथ | स्वराज्य—आश्रम | वेडछी, पोस्ट वालोड, जिल्हा सुरत. | १९ |
| महाराष्ट्र | सर्वोदय—विद्यालय | पिंपळें, ता. सासवड, जिल्हा पुणें. | २६ |
| कर्नाटक | ग्रामसेवासमिति | अकोला, जिल्हा उत्तर कॅनरा. | १८ |

# सर्वोदय-कार्यकर्त्यांचें एक नमुनेदार शिबिर

आधींच ठरविण्यांत येऊन त्याप्रमाणें त्याचा तक्ता शिबिरांत लावण्यांत आला होता.

रोज रात्रीं प्रार्थनेनंतर मनोरंजनाचे कार्यक्रम ठेवण्यांत येत असत. ' मनोरंजनासाठीं मनोरंजन ' हा ह्या कार्यक्रमाचा उद्देश नसून ग्रामीण जनतेचें मन कसें आकर्षित करावें, तिची अभिरुचि कशी शुद्ध ठेवावी, आणि तिच्यावर कसे उत्तम आणि उदात्त संस्कार करावेत—हें शिकविणारे हे कार्यक्रम होते. रोज निरनिराळे छोटेछोटे नाट्यप्रयोग करण्यांत येत असून त्यांत लहान मुलें आणि मुली भाग घेत असत. ईस्ट इंडिया कंपनीच्या लोकांनीं हिंदी कारागिरांचा अनन्वित छळ केल्यामुळें कारागिरांनीं वैतागून आपले अंगठे कसे कापून घेतले, गांधीजींनीं हिंदुस्थानांत आणि दक्षिण आफ्रिकेंत कोणकोणती विविध कामगिरी बजावून आपलें नांव अमर केलें, अशा बोधप्रद विषयांची निवड करून त्यांवर हे नाट्यप्रयोग होत असत.

शिबिर चालूं होतें, तोंपर्यंत दहा दिवस ' शिबिर-दर्पण ' ह्या नांवाचें एका फुलस्केप कागदाचें हस्तलिखित दैनिकहि सायंकाळीं प्रार्थनेच्या वेळीं प्रसिद्ध होत असे. त्यांत त्या दिवशीं झालेल्या चर्चेचा थोडक्यांत गोषवारा देऊन ' आश्रम ' आणि ' शिबिर ' ह्यांत घडलेल्या कांहीं विशिष्ट प्रसंगांसंबंधीं मनोरंजक चुटके देण्यांत येत असत.

वेडछीच्या स्वराज्य-आश्रमामध्यें लहान-मोठ्या निरनिराळ्या संस्था आणि छात्रालयें आहेत. त्यांतील सर्व कार्यकर्ते आणि विद्यार्थी आणि शिबिरांतील सर्व मंडळी—अशा सुमारें ३०० लोकांचा एकत्र सामुदायिक भोजनाचा कार्यक्रम ता. २१–५–५० रोजीं सायंकाळीं आश्रमांतील पटांगणांत ठेवण्यांत आला होता. ह्यासाठीं ज्यांत सर्व स्त्री-पुरुष व्यवस्थितपणें बसतील एवढें विस्तीर्ण वर्तुळ आंखण्यांत आलें होतें, ह्या भोजन समारंभाला हिंदी संघराज्याच्या पार्लमेंटचे अध्यक्ष श्री. दादासाहेब मावळणकर सपत्नीक हजर होते. वर्तुळाच्या मध्यबिंदूच्या ठिकाणीं सुंदर फुलांनीं सजविलेले कलश एकावर एक असे मोठ्या कुशलतेनें रचण्यांत आले होते. त्यामुळें वर्तुळाला मोठी शोभा आली होती ह्यामुळें आश्रमीय जीवनामध्यें कला आणि सौंदर्य ह्यांनाहि महत्त्वाचें स्थान आहे हें कार्यकर्त्यांना चांगलें पटलें. सामुदायिक जीवनाच्या सात्त्विक आनंदाचेंहि तें एक गोड प्रात्यक्षिक होतें.

हें झालें शिबिराच्या बाह्यांगाचें निरीक्षण. आतां त्याच्या अंतरंगांकडे वळतों. शिबिराचा महत्त्वाचा भाग म्हणजे त्यांत निरनिराळ्या विषयांवर झालेली उद्बोधक चर्चा होय.

शिबिरामध्यें सर्वोदय, खादी, नई तालीम, शेती गोपालन, आरोग्य, सहकारी चळवळ, नियोजन, (Planning), आपली घटना—इत्यादि विषयांवर त्या त्या विषयांतील तज्ज्ञांचीं भाषणें झालीं.

शिबिराचें उद्घाटन गृहमंत्री श्री. मुरारजीभाई देसाई ह्यांनीं केलें. असें करण्यांत एक प्रकारचें औचित्य होतें. कारण ते मुंबई राज्याच्या सर्वोदय-समितीचे अध्यक्ष आहेत. ' सर्वोदययोजने 'संबंधीं सरकारचें काय धोरण आहे, तसेंच कार्यकर्त्यांच्या बाबतींत त्यांच्या काय अपेक्षा आहेत ह्याविषयीं त्यांचे विचार समजून घेणें जरूर होतें. ह्या दृष्टीनें शिबिराच्या उद्घाटन प्रसंगीं त्यांनीं केलेलें भाषण मननीय होतें : " अधिकांत अधिक लोकांचें अधिकांत अधिक कल्याण (greatest good of the greatest number) करण्याची पाश्चात्यांची कल्पना आहे. परंतु गांधीजींची कल्पना सर्वांचें अधिकांत अधिक कल्याण (greatest good of all) करण्याची आहे. " ह्याप्रमाणें दोन्ही विचारसरणींत कसा फरक आहे, हें त्यांनीं प्रथम स्पष्ट करून हाच सर्वोदयाचा सिद्धान्त आहे असें सांगितलें. " कम्युनिस्ट लोकांना सत्य-अहिंसेचें बंधन नसल्यामुळें ते लोक वाटेल तीं साधनें वापरतात, परंतु गांधीजींचा साधनशुद्धीवर फार जोर होता. सर्वोदयाच्या ध्येयाला अनुसरून आपल्याला जो अहिंसक समाज निर्माण करावयाचा आहे तो लोकशाही सरकार आणि सेवक ह्या दोहोंच्या सहकार्यानें होईल. लोकशाही सरकार आपल्या कायद्यामार्फत एखादी गोष्ट करूं शकेल; परंतु लोकांचें मानस-आणि-हृदयपरिवर्तन हें आदर्श सेवकांमार्फतच होऊं शकेल. ह्या सेवकांना माणुसकीनें राहणारे लोक समाजांत निर्माण करावयाचे आहेत. लोकांच्या भावना, मानस, हृदय ह्यांत परिवर्तन घडवून








आणणें हें सोपें काम नाहीं. त्यासाठीं कार्यकर्त्यांनीं स्वतःचें जीवन शुद्ध ठेवलें पाहिजे. तसें ते करतील तरच समाजावर त्यांची छाप पडेल. कार्यकर्त्यांनीं आपल्या सहकाऱ्यांशीं वागतांना सहिष्णु वृत्ति राखली पाहिजे. कोणाचा तिरस्कार न करतां त्यांनीं नम्रता अंगीं बाणविली पाहिजे. कार्यकर्त्यांनीं आपल्या बुद्धीला विवेकाची मर्यादा घातली पाहिजे. आपल्याला जें कार्य करावयाचें आहे, त्याची संपूर्ण कल्पना कार्यकर्त्याला असली पाहिजे."

अखिल-भारतीय-चरखा-संघाचे चिटणीस श्री. कृष्णदास गांधी ह्यांचें खादीसंबंधीं विचारप्रवर्तक भाषण झालें. त्यांनीं कांहीं मौलिक विचार मांडले. ते म्हणाले : " समाज हा ( १ ) लष्करी सत्ता आणि ( २ ) पैशाची सत्ता—ह्यांवर आजपर्यंत चालत आला आहे. त्याला ह्या दोहोंपासून सोडविण्याचा गांधीजींनीं प्रयत्न केला. अहिंसक सत्याग्रहाच्या मार्गानें त्यांनीं राष्ट्राला लष्करी सत्तेपासून सोडविलें, आणि पैशाच्या सत्तेपासून सोडविण्यासाठीं त्यांनीं वस्त्रस्वावलंबनाचा महामंत्र दिला. पैशामुळेंच साधनांचें आणि बऱ्याच बाबतींचें केंद्रीकरण होत असतें. अन्न, वस्त्र वगैरे वस्तू पैशानें न मिळवितां, स्वावलंबनानें मिळविल्या पाहिजेत. आतांपर्यंत खादीचें काम पैशाच्या जोरावर झालें. खादीचें हें युग संपलें. खेड्यांची स्थिति सुधारावयाची असेल, तर त्यांचा पैसा शहरांत जाण्याचें थांबविलें पाहिजे. ज्याप्रमाणें परदेशी कापड परदेशांतून आणणें बंद केलें, त्याप्रमाणें खेड्यांत गिरणीचें कापड जातां कामा नये. ही दृष्टि पुढें ठेवून ७ वर्षांपासून ७० वर्षांपर्यंतच्या लोकांनीं आपला ठराविक वेळ रोज दिला तर खेडीं वस्त्रस्वावलंबी होऊं शकतील. सध्यां शुद्ध खादी तिला म्हणावयाची कीं, जी निर्माण करतांना पैशाचा उपयोग झाला नसेल. म्हणजे कपाशीची पैदास, पेळू, पिंजण, विणकाम ह्या चारी क्रिया आम्ही घरच्या घरीं, पैशाचा उपयोग न करतां केल्या तर ती खादी ' स्वावलंबी ' होईल. आपलें लक्ष गति वाढविणाऱ्या साधनांचा शोध करण्याकडे असण्यापेक्षां जास्तींत जास्त माणसें तीं साधनें वापरतील अशीं अवजारें शोधण्याकडे असलें पाहिजे. दुबट सुताचें विणकाम सुलभ असतें. दुबट सुताची खादी अधिक टिकतेहि. आपल्याला खेड्यांपाड्यांतून ग्रामराज्यें स्थापन करावयाचीं असतील, आपल्याला शोषणरहित अहिंसक समाज निर्माण करावयाचा असेल, तर ह्या दृष्टीनें सर्व कामें झालीं पाहिजेत. ' कताईमंडळें ' ह्याच दृष्टीनें स्थापन झालीं आहेत. सहकारी सोसायट्यांचा उपयोग ह्या दिशेनें झाला पाहिजे. "

ह्या शिबिरामध्यें श्री. नारायण महादेव देसाई आणि श्री. मोहन नरहरी परीख हे आपल्या कर्तबगारीनें चांगले चमकले. हे दोघे तरुण महात्माजींचे अंतेवासी अनुक्रमें श्री. महादेव देसाई आणि श्री. नरहरी परीख ह्यांचे चिरंजीव. श्री. महादेव देसाई आणि श्री. नरहरी परीख हे दोघेहि विद्वान् असून आपल्या ऐन तारुण्यांत सर्व ऐहिक सुखांवर तिलांजलि देऊन महात्माजींना येऊन मिळालेले. महात्माजींना प्रचलित शिक्षणपद्धति अत्यंत सदोष दिसे. म्हणून त्यांनीं आपल्या कोणत्याहि मुलाला विद्यमान शाळा-कॉलेजामध्यें न पाठवितां, आपल्या स्वतंत्र पद्धतीनें शिक्षण दिलें. तेव्हां श्री. महादेवभाई आणि नरहरीभाई ह्यांनीं सुद्धां आपल्या मुलांना प्रचलित शाळा-कॉलेजांत न पाठवितां स्वतंत्ररीत्या शिक्षण दिलें. ह्या दोहोंना ' नई तालीम ' मिळाली. नई तालीम मिळाली असतां मनुष्याचा कसा सर्वांगीण विकास होतो, ह्याची हे दोन तरुण म्हणजे उत्कृष्ट उदाहरणें होत. ह्या तरुणांची बुद्धिमत्ता, विद्वत्ता, संशोधन-वृत्ति, विषय समजावून देण्याची हातोटी, विनय वगैरे औरच होतीं. ते सध्यां ' नई तालीम 'ची एक शाळा वेडछीच्या स्वराज्य—आश्रमामध्यें चालवितात. ते स्वतः ' नई तालीम ' घेऊन तयार झालेले असल्यामुळें ' नई तालीम 'चा त्यांना चांगला अनुभव आहे. ' नई तालीम'चेच प्रयोग ते आपल्या शाळेंत करीत असतात. ह्या सर्व कारणांमुळें ' नई तालीम ' वर बोलण्यास तेच अधिकारी होते, आणि म्हणून त्यांचीच निवड करण्यांत आली होती.

श्री. नारायण देसाई ह्यांनीं ' नई तालीम ' ह्या विषयाचें सांगोपांग सुंदर विवेचन केलें. " गांधीजींच्या वैचारिक देणग्यामध्यें नई तालीमला फार महत्त्वाचें स्थान आहे. नई तालीम म्हणजे








# सर्वोदय-कार्यकर्त्यांचें एक नमुनेदार शिबिर

' प्रोजेक्ट मेथड ' नव्हे. इंग्रजी राजवटींत दारूच्या उत्पन्नावर शिक्षणाचा खर्च चाले ही गोष्ट गांधीजींना फार बोचत होती. म्हणून शिक्षण स्वावलंबी झालें पाहिजे असें त्यांचें मत होतें. ' नई तालीम 'च्या शाळांतून जें शिक्षण मिळेल त्यांतून शाळेचा खर्च भागला पाहिजे. हिंदुस्थानच्या सात लाख खेड्यांतून शिक्षणाचा प्रसार करण्याला ' नई तालीम'चा उपयोग होईल. ह्या दृष्टीनें ह्या शिक्षणाकडे पाहिलें पाहिजे. नई तालीम हें जीवनशिक्षण असल्यामुळें व त्याला स्थल आणि काल यांचें बंधन नसल्यामुळें तें मरेपर्यंत चालूं असतें. नई तालीमच्या शाळेंत उद्योगद्वारां शिक्षण दिल्यानें विद्यार्थ्यांच्या सर्व इंद्रियांचा विकास होतो. त्यांचें अभिव्यक्तिसामर्थ्य ( power of expression ) आणि निर्णयशक्ति ह्यांचाहि विकास होतो. त्यांना एकाच नव्हे तर अनेक उद्योगांच्याद्वारां, उदा० (१) चरखा ( २ ) शेती ( ३ ) मधुमक्षिकापालन ( ४ ) तेल-घाणे (५) कुक्कुटपालन ह्यांच्या द्वारां शिक्षण देतां येतें.'' ह्याप्रमाणें प्रस्तावना करून हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांत ह्या शिक्षणाचे प्रयोग कोठें कोठें कसकसे चालूं आहेत, वेगवेगळे विषय शिकविण्याच्या बाबतींत शिक्षकानें कोणकोणती खबरदारी घ्यावयास पाहिजे, ह्यासंबंधीं त्यांनीं आपल्याला मिळालेल्या अनुभवांच्या द्वारां मार्मिक विवेचन केलें.

श्री. मोहनभाई परीख ह्यांनीं सांगितलें कीं, '' हल्लींच्या शाळेमध्यें अमुक विषय अमुक वेळांत शिकविला पाहिजे अशा तऱ्हेचें बंधन असतें. उलट, शाळांऐवजीं परिश्रमालयें काढून त्यांच्या द्वारा ' नई-तालीम 'चे प्रयोग करणें सुलभ होत असतें.'' त्यांनीं ' शालाचक्र ' ह्या नांवाचा एक बांबूचा चरखा बनविला आहे. हा चरखा अत्यंत कमी खर्चांत म्हणजे १ रुपयापासून १। रुपयापर्यंतच्या पैशांत तयार होतो. ह्याला चातीशिवाय इतर कोणत्याहि प्रकारचें लोखंड वापरण्यांत आलेलें नाहीं. बांबू ही खेड्यांत मिळण्यासारखी वस्तु असून खेड्यांतल्या खेड्यांत तो दुरुस्त होऊं शकतो. त्याची गतिहि ठीक असते. ह्या चरख्यावर त्यांनीं स्वतः कांतून दाखवून त्याची उपयुक्तता समजावून दिली.

' आणंद 'च्या शेतकी कॉलेजचे प्रिन्सिपल डॉ. मगनभाई पटेल ह्यांचें ' शेती आणि गोपालन.' ह्या-विषयावर मननीय व्याख्यान झालें. '' ह्या विषयाचा विचार करतांना ' माणसांची आणि गुरांची वाढती लोकसंख्या ' ह्याचा प्रथम विचार केला पाहिजे. आपल्या देशांत माणसांची आणि गुरांची संख्या अधिक असून त्या मानानें त्यांचें अन्न अनुक्रमें धान्य आणि चारा हीं कमी प्रमाणांत आहेत. अमेरिकेंत दरमाणशीं जमिनीचें सरासरी प्रमाण ११ एकर आहे आणि हिंदुस्थानांत तें $\frac{७}{१०}$ एकर पडतें, आणि ह्या $\frac{७}{१०}$ एकर जमिनींतून माणसें आणि गुरें ह्यांचें पोषण करावें लागतें. अशा रीतीनें माणसें आणि गुरें ह्यांच्या खाद्यपदार्थांमध्यें एक प्रकारें स्पर्धा चालते. अशा परिस्थितींत गाईची दूध देण्याची शक्ति वाढली पाहिजे. भाकड गाई गर्भवती होतील अशी योजना केली पाहिजे. भाकड गाईंना कृत्रिमरीत्या वीर्यदान ( artificial insemination) करून ही गोष्ट साध्य करतां येते, गाईमध्यें म्हशीइतकें दूध देण्याची शक्ति आहे. हिंदुस्थानची शेती कधींहि यंत्रानें यशस्वी होणार नाहीं. बैलांचा उपयोग करावाच लागेल.''

हिंदुस्थान सरकारनें एक नियोजन-समिति (Planning Commission) नेमली आहे. ह्या समितीचे श्री. गुलझारीलाल नंदा हे उपाध्यक्ष आहेत. त्यांनीं एक दिवस येऊन आपल्या समितीची माहिती दिली आणि कार्यकर्त्यांना ह्या कार्यामध्यें सहकार्य करण्यास विनंति केली. कार्यकर्त्यांनीं ' हें नियोजन गांधीजींच्या तत्त्वानुसार, व्हावें, स्वावलंबन आणि विकेंद्रीकरण ह्यांना धरून व्हावें, तें व्यक्ति आणि समाज ह्या दोहोंचें कल्याण आणि खेड्यांचें पुनरुज्जीवन करणारें व्हावें ' असें सुचविलें.

हिंदी संघराज्याच्या पार्लमेंटचे अध्यक्ष श्री. दादासाहेब मावळणकर हेहि दोन दिवस वेडछीला राहून गेले. त्या वेळीं त्यांचेंहि ' आपली घटना ' ह्या विषयावर व्याख्यान झालें. '' कायदा झाला तरी समाजाचें रक्षण, समाजाची प्रगति हीं, समाजांतील व्यक्तींचें चारित्र्य, त्यांच्या जीवनाचा उद्देश, आपआपसांत हे लोक कशा रीतीनें राहतात, थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे त्यांच्यांत माणुसकी ज्याप्रमाणांत बाणली असेल त्यावर अवलंबून असतात.








व्यक्ति-स्वातंत्र्याचा अर्थ जितकें स्वातंत्र्य मी इच्छितों तितकें सर्वांना मिळावें, माझ्या कोणत्याहि कृतीनें इतरांना त्रास होणार नाहीं असें आचरण'' असें त्यांनीं प्रतिपादन केलें.

महात्माजींचे अंतेवासी श्री. नरहरि परीख हे सध्यां आपल्या मुलाजवळ वेडछीलाच राहातात. त्यांनीं शिबिरामध्यें होणाऱ्या चर्चेंत भाग घेऊन कार्यकर्त्यांना बरेंच मार्गदर्शन केलें. 'यंत्राची मर्यादा' ह्या नांवाचें पुस्तक त्यांनीं लिहिलें असल्यामुळें त्या विषयासंबंधींचे आपले विचार त्यांनीं मांडले :

"कांहीं यंत्रें गति वाढवितात, कांहीं शक्ति वाढवितात. कांहीं खूप माल काढतात. तेव्हां स्थानिक परिस्थिति पाहून हीं यंत्रें वापरणें राष्ट्राला हितकारक ठरतें कीं नाहीं हें पाहून तीं वापरलीं पाहिजेत. कांहीं यंत्रें आपल्याला अनिवार्य आहेत, कांहीं यंत्रें मर्यादेंतच वापरलीं पाहिजेत, आणि राष्ट्राला विघायक ठरणारीं यंत्रें वापरतांच कामा नये'' हें त्यांच्या म्हणण्याचें सार होतें.

सुरतच्या आयुर्वेद-महाविद्यालयाचे आचार्य श्री. बापालाल वैद्य ह्यांनीं घरगुती उपचारांवर उपयुक्त माहिती सांगितली.

"सुरतेनजीक तापी नदीवर, काकरपाडा येथें एक धरण बांधण्यांत येणार आहे. ह्या धरणामुळें ८० मैलांचा टापू समृद्ध होणार आहे. कारण हजारों एकर जमीन पाण्यानें भिजणार आहे. ह्या बंधाऱ्यापासून जे पाट काढण्यांत येतील त्यांवर नावा चालवून मालाची ने-आण होऊन व्यापाराची वृद्धि होईल आणि ह्या सर्व भागांत वीज खेळेल. ही योजना पुरी व्हायला ७ वर्षें लागतील आणि तिच्यासाठीं वीस कोटी रुपये खर्च होतील—" अशी माहिती ह्या धरणाचे एंजिनियर श्री. पाटील ह्यांनीं सांगितली.

ह्या भागांत सहकारी तत्त्वावर सामुदायिक शेतीचे प्रयोग—(१) अंबाच (२) शेढीफळीया आणि (३) कोकणवाड ह्या ठिकाणीं चालू आहेत. ह्यांपैकीं पहिलीं दोन ठिकाणें कार्यकर्त्यांना प्रत्यक्ष पहायला मिळालीं. ह्या दोन्ही ठिकाणीं नदीच्या पात्रांतून एंजिननें पाणी खेचण्याची व्यवस्था करण्यांत आली आहे. ह्या सामुदायिक शेतीच्या प्रयोगांत जीं कुळें सामील झाली आहेत, त्यांनीं आपली जमीन, आपलीं औतें, आपले बैल वगैरे सर्व ह्या शेतीसाठीं दिलीं असून तीं सामुदायिक शेती गुण्यागोविंदानें करीत आहेत. हीं माणसें ज्या प्रमाणांत श्रम करतात त्या प्रमाणांत त्यांना मजुरी मिळते. ह्या सोसायट्यांना आपल्या कामासाठीं बाहेरचे मजूर आणावे लागत नाहींत. ह्यांना सरकारकडून शेतकी-तज्ज्ञ, एंजिनसाठीं अर्धी मदत, व इतर मदत नियमांप्रमाणें मिळत असते. ह्या योजनेमुळें जमीनदारांनाहि अधिक खंड मिळाला. हे प्रयोग आशाजनक असून इतर गांवचे लोकहि तसें करतील अशी आशा आहे.

ह्या सामुदायिक शेतीच्या सोसायट्यांचा वार्षिक महोत्सव शेढीफळिया (जिल्हा सुरत) येथें मुंबई सरकारचे 'सहकार आणि अर्थ-खात्यां'चे मंत्री श्री. वैकुंठराय मेहता ह्यांच्या अध्यक्षतेखालीं ता. २३।५।५० रोजीं साजरा करण्यांत आला. अध्यक्ष ह्या नात्यानें समारोपाचें भाषण करतांना ते म्हणाले : "सहकारी तत्त्वावर चालणाऱ्या शेतीच्या संस्था मुंबई राज्यांत फक्त ५० आहेत. रशियांत, लोक सहकारी तत्त्वावर शेती करतात, परंतु ती तेथें जबरदस्तीनें होत असते. येथें हे लोक स्वखुषीनें करीत आहेत, हा फरक लक्षांत घेतला पाहिजे. काँग्रेस-सरकारनें दुसऱ्यांदा जेव्हां राज्यसूत्रें हातीं घेतलीं तेव्हांपासून ह्या संस्था पहिल्यापेक्षां दुपटीनें वाढल्या आहेत. 'सर्वांच्या कल्याणांत माझें कल्याण आहे, प्रत्येकाची उन्नति सर्वांच्या मेहनतीवर आहे'—हें ह्या सरकारी संस्थांनीं दाखवून दिलें आहे. हे प्रयोग म्हणजे क्रांतिमय जीवनाचा पाया होत. हे प्रयोग लोकांना नवजीवनाकडे घेऊन जातील. ह्या प्रयोगाच्या यशस्वितेवर देश समृद्ध होणार आहे. हे लोक १२ महिने शेतीचें पीक घेऊन, शिवाय विटा पाडणें वगैरे. ग्रामोद्योगहि करून ते आपल्या उत्पन्नांत भर घालतात. ह्याबद्दल मी त्यांना धन्यवाद देतों."

ह्याप्रमाणें ह्या शिबिराच्या कार्यकर्त्यांना जीवनाच्या अनेक विषयांवरील उपयुक्त भाषणें ऐकावयास मिळालीं.

ह्या शिबिराच्या संचालनामध्यें गुजराथचे सुप्रसिद्ध



अनुक्रमणिका






व्यक्ति-स्वातंत्र्याचा अर्थ जितकें स्वातंत्र्य मी इच्छितों तितकें सर्वांना मिळावें, माझ्या कोणत्याहि कृतीनें इतरांना त्रास होणार नाहीं असें आचरण " असें त्यांनीं प्रतिपादन केलें.

महात्माजींचे अंतेवासी श्री. नरहरि परीख हे सध्यां आपल्या मुलाजवळ वेडछीलाच राहातात. त्यांनीं शिबिरामध्यें होणाऱ्या चर्चेंत भाग घेऊन कार्यकर्त्यांना बरेंच मार्गदर्शन केलें. 'यंत्राची मर्यादा' ह्या नांवाचें पुस्तक त्यांनीं लिहिलें असल्यामुळें त्या विषयासंबंधींचे आपले विचार त्यांनीं मांडले :

" कांहीं यंत्रें गति वाढवितात, कांहीं शक्ति वाढवितात. कांहीं खूप माल काढतात. तेव्हां स्थानिक परिस्थिति पाहून हीं यंत्रें वापरणें राष्ट्राला हितकारक ठरतें कीं नाहीं हें पाहून तीं वापरलीं पाहिजेत. कांहीं यंत्रें आपल्याला अनिवार्य आहेत, कांहीं यंत्रें मर्यादेंतच वापरलीं पाहिजेत, आणि राष्ट्राला विघातक ठरणारीं यंत्रें वापरतांच कामा नये " हें त्यांच्या म्हणण्याचें सार होतें.

सुरतच्या आयुर्वेद-महाविद्यालयाचे आचार्य श्री. बापालाल वैद्य ह्यांनीं घरगुती उपचारांवर उपयुक्त माहिती सांगितली.

" सुरतेनजीक तापी नदीवर, काकरपाडा येथें एक धरण बांधण्यांत येणार आहे. ह्या धरणामुळें ८० मैलांचा टापू समृद्ध होणार आहे. कारण हजारों एकर जमीन पाण्यानें भिजणार आहे. ह्या बंधाऱ्यापासून जे पाट काढण्यांत येतील त्यांवर नावा चालवून मालाची ने-आण होऊन व्यापाराची वृद्धि होईल आणि ह्या सर्व भागांत वीज खेळेल. ही योजना पुरी व्हायला ७ वर्षें लागतील आणि तिच्यासाठीं वीस कोटी रुपये खर्च होतील—" अशी माहिती ह्या धरणाचे एंजिनियर श्री. पाटील ह्यांनीं सांगितली.

ह्या भागांत सहकारी तत्त्वावर सामुदायिक शेतीचे प्रयोग—( १ ) अंबाच ( २ ) शेढीफळीया आणि ( ३ ) कोकणवाड ह्या ठिकाणीं चालू आहेत. ह्यांपैकीं पहिलीं दोन ठिकाणें कार्यकर्त्यांना प्रत्यक्ष पहायला मिळालीं. ह्या दोन्ही ठिकाणीं नदीच्या पात्रांतून एंजिननें पाणी खेचण्याची व्यवस्था करण्यांत आली आहे. ह्या सामुदायिक शेतीच्या प्रयोगांत जीं कुळें सामील झाली आहेत, त्यांनीं आपली जमीन, आपलीं औतें, आपले बैल वगैरे सर्व ह्या शेतीसाठीं दिलीं असून तीं सामुदायिक शेती गुण्यागोविंदानें करीत आहेत. हीं माणसें ज्या प्रमाणांत श्रम करतात त्या प्रमाणांत त्यांना मजुरी मिळते. ह्या सोसायट्यांना आपल्या कामासाठीं बाहेरचे मजूर आणावे लागत नाहींत. ह्यांना सरकारकडून शेतकी-तज्ज्ञ, एंजिनसाठीं अर्धी मदत, व इतर मदत नियमांप्रमाणें मिळत असते. ह्या योजनेमुळें जमीनदारांनाहि अधिक खंड मिळाला. हे प्रयोग आशाजनक असून इतर गांवचे लोकहि तसें करतील अशी आशा आहे.

ह्या सामुदायिक शेतीच्या सोसायट्यांचा वार्षिक महोत्सव शेढीफळिया ( जिल्हा सुरत ) येथें मुंबई सरकारचे 'सहकार आणि अर्थ-खात्यां'चे मंत्री श्री. वैकुंठराय मेहता ह्यांच्या अध्यक्षतेखालीं ता. २३।५।५० रोजीं साजरा करण्यांत आला. अध्यक्ष ह्या नात्यानें समारोपाचें भाषण करतांना ते म्हणाले : " सहकारी तत्त्वावर चालणाऱ्या शेतीच्या संस्था मुंबई राज्यांत फक्त ५० आहेत. रशियांत, लोक सहकारी तत्त्वावर शेती करतात, परंतु ती तेथें जबरदस्तीनें होत असते. येथें हे लोक स्वखुषीनें करीत आहेत, हा फरक लक्षांत घेतला पाहिजे. काँग्रेस-सरकारनें दुसऱ्यांदा जेव्हां राज्य-सूत्रें हातीं घेतलीं तेव्हांपासून ह्या संस्था पहिल्यापेक्षां दुपटीनें वाढल्या आहेत. 'सर्वांच्या कल्याणांत माझें कल्याण आहे, प्रत्येकाची उन्नति सर्वांच्या मेहनतीवर आहे'—हें ह्या सरकारी संस्थांनीं दाखवून दिलें आहे. हे प्रयोग म्हणजे क्रांतिमय जीवनाचा पाया होत. हे प्रयोग लोकांना नवजीवनाकडे घेऊन जातील. ह्या प्रयोगाच्या यशस्वितेवर देश समृद्ध होणार आहे. हे लोक १२ महिने शेतीचें पीक घेऊन, शिवाय विटा पाडणें वगैरे. ग्रामोद्योगहि करून ते आपल्या उत्पन्नांत भर घालतात. ह्याबद्दल मी त्यांना धन्यवाद देतों. "

ह्याप्रमाणें ह्या शिबिराच्या कार्यकर्त्यांना जीवनाच्या अनेक विषयांवरील उपयुक्त भाषणें ऐकावयास मिळालीं.

ह्या शिबिराच्या संचालनामध्यें गुजराथचे सुप्रसिद्ध










# सर्वोदय-कार्यकर्त्यांचें एक नमुनेदार शिबिर

कार्यकर्ते श्री. बबलभाई मेहता आणि दिलखुष दिवाणजी ह्यांची बहुमोल मदत झाली.

ह्या शिबिराचा प्राण किंवा स्फूर्तिस्थान म्हटलें तर, श्री. जुगतरामभाई होत. जुगतरामभाई हे गुजराथच्या विधायक कार्यकर्त्यांचे अग्रणी आहेत. महात्माजींना कोचरब आणि साबरमतीच्या आश्रमांत जे कार्यकर्ते मिळाले त्यापैकीं हे एक होत. कांहीं वर्षे साबरमतीच्या आश्रमांत घालविल्यानंतर ते सुरत जिल्ह्यांतील आदिवासींच्या सेवेसाठीं आले, तेव्हां-पासून सुमारें २५ वर्षें ते येथें चिकाटीनें कार्य करीत आहेत. त्यांच्या ह्या चिकाटीचें फळ म्हणून त्यांच्या कार्याचा खूप प्रसार झाला आहे. लोकांचा त्यांनीं विश्वास संपादन केला आहे. ते नैष्ठिक ब्रह्मचारी असून तत्त्वनिष्ठ, संयमी, तपस्वी आणि मुमुक्षु आहेत. त्यांची प्रत्येक कृति ह्या जीवनाला साजेशी अशीच असते. ह्या शिबिरांत जेव्हां जेव्हां ते बोलले तेव्हां त्यांनीं जीवनशुद्धि, आत्मसंशोधन, आत्म-विकास ह्यांवरच जोर दिला. "कष्ट म्हणजे दुःख नव्हे, कार्यकर्त्यांनें तात्कालिक परिणामाच्या दृष्टीनें कार्य करतां कामा नये, त्यानें उतावीळ होऊं नये. गांधीजींच्या प्रत्येक कार्यक्रमाची सुरुवात व्यक्तिगत जीवनापासून करावयाची आहे. आपणाला जें सत्य वाटतें, तें बेधडक सांगितलें पाहिजे. कोणाला भिऊन आपण जर तें सांगितलें नाहीं तर तो आपलाच दोष होय. आपल्या आत्म्याचा विकास होईल ह्या दृष्टीनें सर्व योजना आपण आंखल्या पाहिजेत. आपला आत्मा आणि स्वधर्म ओळखून आपण आपलें काम केलें पाहिजे, आपली सेवा ही तेजस्वी वस्तु आहे हें आपण लक्षांत ठेवलें पाहिजे. आपण आपलें जीवन, संस्थेचें जीवन खेड्याचें जीवन–ह्या सर्वांचा विचार करून समाजांत वागलें पाहिजे." हीं त्यांचीं विचार-मौक्तिकें, त्यांचें जोवन किती उच्च प्रकारचें आहे, हें स्पष्ट करून दाखवितात.

---

## शेत-मजुरांची संघटना (पान ८ वरून पुढें चालू)

कर्त्यांनीं त्या कामीं जनतेचें साहाय्य घेणें इष्ट होईल. या कार्यकर्त्यांनीं किसानांना शिक्षण द्यावेंच, पण त्यावरोबरच स्वतःची जमीन नसलेल्या, शेतीवर राबणाऱ्या मजुरांच्या तक्रारींची, त्यांच्यावर होणाऱ्या अन्यायांची जनतेला माहिती करून द्यावी. योग्य, अनुकूल समय आला आहे असें दिसतांच निदान एक वर्ष आधीं जमीन-मालकांना सूचना द्यावी कीं, जर शेतमजूरांच्या मागण्या मान्य झाल्या नाहींत, तर जमिनी तशाच पडीत राहतील, त्यांची लागवड करावयाला कोणीहि मजूर मिळणार नाहीं ! जर कार्य-कर्त्यांकडून त्या त्या टापूंतून व्यवस्थित काम झालें तर आजूबाजूच्या खेड्यांतून कोणीहि शेतकरी 'संपफोड्ये' ( Black-legs) म्हणून जमिनीची लागवड करण्याकरितां येणार नाहींत. सरकारलाहि वरील प्रकारची सूचना देण्यांत यावी. जमीनी पडीत राहिलेल्या स्वस्थपणें पहाणें सरकारला कसें शक्य आहे ? अशा रीतीनें जमीनमालक उघडे पडतील आणि किसानांच्या मागण्यांना जर त्या मागण्या न्याय्य असतील, तर जनता आणि सरकार यांचें पाठबळ मिळेल.

अर्थात् वर वर्णन केलेल्या कार्यपद्धतींत खूप कष्ट आहेत, हें खरें. परंतु सुपरिणाम घडवून आणावयाचे म्हणजे बराच काळपर्यंत काम करीत कळहि खूप सोसली पाहिजे. याशिवाय दुसरा मार्ग नाहीं.

---






श्री. प्रेमा कंटक

# 'न त्याज्यं कार्यमेव तत्।'

महाराष्ट्रांत कॉंग्रेसचें अधिवेशन भरणार आहे. यानिमित्त लेखकांच्या लेखणीलाहि स्फूर्ति मिळाली पाहिजे, अशी पुष्कळजणांची अपेक्षा आहे. इंग्रजांच्या काळांत नव्हता इतका बोलबाला आज कॉंग्रेसचा झाला आहे. सख्यभक्तीपेक्षांहि विरोधभक्ति अधिक जाज्वल्य असते. त्यामुळें शत्रु-मित्र–उदासीन सर्वांनाच आज जळींस्थळीं कॉंग्रेस दिसूं लागली आहे! आजकाल असें एकहि वर्तमानपत्र नाहीं कीं, ज्यांत कॉंग्रेसबद्दल प्रतिकूल वा अनुकूल लिहिलें जात नाहीं; एकहि व्याख्यान होत नाहीं कीं, ज्यांत कॉंग्रेसबद्दल भलाबुरा उच्चार होत नाहीं. साहित्यसंमेलनांसारख्या सोंवळ्या सभांतूनसुद्धां कॉंग्रेसचा उद्धार केला जातो. तेव्हां कॉंग्रेसबद्दल बरेवाईट सर्व प्रकारचे उद्गार देशांतील व परदेशांतील माणसें काढीत असतां महाराष्ट्रांत अधिवेशन भरणार आहे या घटनेमुळें विशेष स्फूर्ति येऊन तिच्याबद्दल काय लिहावयाचें हा प्रश्न लेखकांसमोर येऊन पडला तर, त्यांत आश्चर्य नाहीं. फैजपूरला कॉंग्रेस भरली तेव्हां उत्कंठेनें, भावनावेगानें महाराष्ट्राचें अंतःकरण थरारलें! कारण चाळीस वर्षांनीं महाराष्ट्रांत अधिवेशन भरणार होतें. इंग्रज-सरकारशीं अखिल भारतीय पायावर कॉंग्रेसचे नुकतेच दोन हात झाले होते. ती मधली युद्धतहकुबीची अवस्था होती; पवित्रा बदलावयाचा होता. राष्ट्रांचा प्रियदर्शी नेता राष्ट्रपिता जिवंत होता. लोकांना औत्सुक्य होतें. आणि आज—? आज काय आहे? बंगळूरनें नकार दिला म्हणून महाराष्ट्रानें लाज राखली! दिल्लीला महाराष्ट्राचे पुढारी कॉंग्रेस संघटनेचा भार आपल्या शिरावर घेऊन बसले आहेत. त्यांच्या जबाबदारींत हिस्सेदार होण्याची महाराष्ट्राचीहि भावना होती.

वेदांमध्यें स्तुतिप्रकरणांत पुढील वाक्य आढळतें : "ते ऋतूंचा द्रोह करीत नाहींत." ऋतू बदलतात त्याप्रमाणें आपली राहणी बदलत गेली पाहिजे, तर आपलें आरोग्य कायम राहतें. सृष्टीचे नियम ओळखून त्यांना अनुरूप असें परिवर्तन आपल्या जीवनांत होत गेलें पाहिजे. परिस्थितीमुळें अधिवेशन कधीं न भरलेल्या ऋतूंत भरत आहे, अशा प्रसंगीं ऋतुनिष्ठ राहण्याचा प्रयत्न करीत अधिवेशनाचा सगळा घाटच बदलून टाकण्याची आवश्यकता निर्माण झाली आहे. ऋतुनिष्ठा व ऋतनिष्ठा यांत फारसा फरक नाहीं. महाराष्ट्राच्या निष्ठेची कसोटी होण्याची संधि ईश्वरानें पुन्हां एकवार आणून दिली आहे.

अधिवेशनासाठीं महाराष्ट्रानें किती तप केलें पाहिजे व केवढ्या त्यागास सिद्ध झालें पाहिजे त्याची चर्चा करण्याचा उद्देश येथें नाहीं. महाराष्ट्रांत सामाजिक सद्‌गुण जितक्या प्रमाणांत उत्कर्षास पोंचले असतील तितक्या प्रमाणांत कार्य सिद्ध होईल. सामाजिक जबाबदारीची उत्पत्ति यज्ञवृत्तींतून होते. समाजधारणेसाठीं केलेलें तप तो यज्ञ होय. अशा यज्ञांतून यज्ञकर्त्यांची शक्ति क्षीण होण्याचें भय नसतें. राष्ट्रासाठीं महाराष्ट्र तप करील, यज्ञ करील, तर त्याची शक्ति उत्तरोत्तर वाढतच जाईल.

### कॉंग्रेसवरील आरोप कांहीं नवीन नाहींत!

ज्या कॉंग्रेसच्या प्रतिष्ठेसाठीं महाराष्ट्र आज यज्ञकर्मासाठीं सिद्ध झाला आहे, त्या कॉंग्रेसबद्दल



अनुक्रमणिका






कांहींहि विचार वा भावना व्यक्त करणें किती कठिण व चमत्कारिक आहे याचा ऊहापोह मी प्रारंभीं केलाच आहे. कॉंग्रेसच्या हातांत आज राजकीय सामर्थ्य एकवटलें आहे म्हणून ती पतित झाली आहे, अशी एक विचारधारा आज कॉंग्रेसच्या विरोधकांत त्याचप्रमाणें कॉंग्रेसच्या अनुयायांतहि पसरून राहिली आहे. सत्य हें अल्प-मतवालें असतें अशा अर्थाची एक म्हण इंग्रजींत आहे. महात्माजी वारंवार त्या वाक्याची आठवण भोंवतालच्या मंडळींस करून देत. त्या वेळींहि मला वाटे कीं, परमेश्वर किंवा सत्य नांवाची शक्ति या विश्वांत आहे असें मत पृथ्वीवरील बहुसंख्याक लोकांचें आहे म्हणून तें काय खोटें मानावें ? समाज-हितासाठीं प्रयत्न करणारी व्यक्ति वा संस्था बहुसंख्य लोकांचा पाठिंबा मिळवून महान् झाली, विजयी ठरली कीं, लगेच तिच्या बाजूनें असलेलें सत्य लुप्त झालें असें कसें म्हणतां येईल ! उलट प्रारंभीं अल्पमत असलेल्यांचा विजय घडवून आणून सत्यानें वरील सिद्धान्ताची सत्यता पटवून दिली आहे असें कां म्हणूं नये ?

आज कॉंग्रेस सत्तारूढ आहे. निवडणुकांतून तिचीच सरशी होत आहे, राज्याचें रक्षण व पोषण तीच करीत आहे; तरी जास्तींत जास्त शिव्याहि तीच खात आहे. सारीं पापें तिच्याच माथीं मारलीं जात आहेत. तिला जुलमी म्हटलें जातें तरी तिची भीति विरोधकांनाहि वाटत नाहीं. तिला सत्ता-लोलुप म्हटलें जातें पण तिचा अनुग्रह मिळ-विण्याची अपेक्षा विरोधकांना सुद्धां असते. सत्तारूढ झाल्यावर तिचें पतन झाल्याची ग्वाही देणारीं माणसें व पक्ष तीच सत्ता स्वतःच्या हातीं यावी यासाठीं धडपडत असतात.

सामाजिक आदर्शांत विकृति निर्माण झाल्याचें हें द्योतक आहे कीं काय असा प्रश्न वारंवार मनांत उभा राहातो.

बहुधा १९१५ चें साल असावें. मी त्या वेळीं मुंबईत मराठी शाळेंत शिकत होतें. रजेच्या दिवशीं सायंकाळीं मरीन लाइन्सच्या बाजूस फिरावयास जाण्याचा आमचा परिपाठ होता. एके दिवशीं सायंकाळीं मावशीसह फिरावयास गेलें असतां समुद्र-कांठीं भव्य मंडप उभारलेला दृष्टीस पडला. त्याच्या प्रवेशद्वारावर दोन उंच मीनार होते. दाराशीं भय्या उभा होता. जाणारे येणारे लोक कुतूहलानें मंडपा-कडे पहात आपसांत बोलत होते. माझ्या मावशीनें भय्याला हिंदींत विचारलें. " भय्याजी, ह्या मंडप कशाकारितां ? " भय्यानें उत्तर दिलें. " येथें कॉंग्रेस भरणार आहे." त्या वेळीं कॉंग्रेस हा शब्द मीं प्रथम ऐकला. मला त्या शब्दाचा अर्थ कळला नाहीं. अदृश्य शक्तीनें त्या शब्दाशीं माझें भावी जीवन निगडित केलें आहे ही कल्पनाहि माझ्या बालमनाला शिवली नाहीं. कॉंग्रेस हा शब्द इंग्रजी आहे हेंही मला माहीत नव्हतें. कांहीं तरी गूढ शब्द ऐकाव-याला मिळाला अशा भावनेनें भारलेलें माझें बाल-मन आप्तवाक्याचें प्रामाण्य तात्पुरतें समाधानकारक मानून घेत होतें. कारण माझ्या मावशीनें माझ्या जिज्ञासेला फारसें खुलासेवार उत्तर दिल्याचें स्मरत नाहीं.

यानंतर वर्षें गेलीं. रौलट ॲक्ट पास होण्याचे दिवस आले. तेथून पुढें कॉंग्रेसचा बोलबाला अधिक झाला. महात्मा गांधींच्या नेतृत्वाबरोबरच कॉंग्रे-सचा परिचय अधिकाधिक होत गेला. माझें व्यक्ति-निष्ठ मन महात्माजींच्या प्रभावानें भारून गेलें होतें. तरी देखील त्यांच्या प्रयोगांचें व पराक्रमाचें महान् साधन व क्षेत्र बनलेली कॉंग्रेस-संस्था मला पुढें पुढें प्रिय होत गेली. महात्माजी व कॉंग्रेस यांत अविनाभाव आहे अशी भावना मुंबई कॉंग्रेसपर्यंत जवळजवळ माझ्या मनांत कायम होती. माझ्या कॉलेजच्या दिवसांत कॉंग्रेसचा निधि गोळा करीत किंवा कॉंग्रेसचे सभासद करीत मी फिरत होतें, तेंहि मला आठवतें. पण मी प्रथमच कॉंग्रेसची सभासद झालें ती १९३४ मध्यें सासवडला आल्यावर. तोंपर्यंत कॉंग्रेसच्या चळवळींत भाग घेऊन, तुरुंगवास पत्करूनहि मी कॉंग्रेसची सभासद झालें नव्हतें.

कॉंग्रेसवर पक्षाभिनिवेश, पक्षपात व पक्ष-राजकारण इत्यादि आक्षेप आज घेतले जातात, पण माझ्या कानांना ते नवीन नाहींत. माझ्या कॉलेजच्या दिवसांत मुंबई प्रांतिक कॉंग्रेस-कमिटीच्या कारभारा-बाबत अगदीं हेच आरोप भोंवतालच्या मंडळींनीं











अनुक्रमणिका

केलेले आठवतात. महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस-कमिटीच्या कारभाराशीं माझा प्रत्यक्ष संबंध त्या काळीं नव्हता. वर्तमानपत्रेंहि मी नियमितपणें वाचीत नसें. पण जेव्हां तीं वाचावयास मिळत तेव्हां केळकर-पक्ष नाफेरवाल्यांना अशाच शेलक्या विशेषणांचा अहेर बहाल करी असें मला आठवतें. त्या वेळीं काँग्रेसच्या हातीं राजदण्ड नव्हता, तरी लोकनायकत्व होतें. त्यामुळें मत्सर व असूया यांना भरती येणें स्वाभाविक होतें. पराक्रमी किंवा पुरुषार्थी लोकांत अमर्ष किंवा चुरशीची वृत्ति दिसून येणें शक्य आहे. परंतु दुसऱ्याच्या उत्कर्षानें मनांत जळणें व त्यांचें अहित चिंतिणें हें समाजद्रोहीपणाचें लक्षण आहे. निर्मत्सर चुरस कांहीं त्याला म्हणतां येणार नाहीं. त्यांतूनही विरोधी पक्षांत चुरस सुरू झाली तर उघड लढाई होईल. परंतु एकाच पक्षांतील लोकांत आपसांत मत्सर सुरू झाला तर त्या विषानें पक्ष हतबल होईल, हें ऐतिहासिक सत्य आहे. काँग्रेसच्या इतिहासांतहि असें प्रकार मागें झाले आहेत; आजहि चालू आहेत.

पण इतकें झालें तरी, विरोधकांना वाटते तितकी काँग्रेस दुर्बल नाहीं. ती जितकी दुर्बल व्हावी असें त्यांना वाटतें तितकी ती होतहि नाहीं. असें कां होतें याचेंही कित्येकांना कोडें वाटतें. मला त्यांत कोडें वाटत नाहीं. काँग्रेसमध्यें कित्येक बेजबाबदार, लोभी व हिंसक व्यक्ती असल्या तरी, काँग्रेसची घटना व ध्येयें अबाधित आहेत. शिस्तबद्ध व बुद्धियुक्त लोकशाहीची स्थापना करण्यासाठीं तिचे प्रयत्न चालू आहेत. आपली इच्छा अंमलांत आणण्याकरितां काँग्रेसनें कधींहि शरीरबळाचा उपयोग केला नाहीं, हेंहि खरें आहे. जनसमुदायाला शिकवून तयार करावयाची तिची धडपड सतत दिसून येते. असें असल्यामुळें काँग्रेसची पुण्याई अद्याप टिकून आहे. केवळ अधिकाराच्या बळावर काँग्रेसनें लोकांना वश करून घेतलें नाहीं. विनोबाजी व किशोरलालभाई-सारखे निःस्पृह तत्त्वज्ञानी काँग्रेसबद्दल निष्ठा बाळगून आहेत याचें कारण हेंच आहे. समाजांत किंवा संस्थेंत चोर किंवा ठक लोकांची संख्या जास्त होईल तर समाज किंवा संस्था अधिक काळ टिकणार नाहीं.

### लोकशाहींत समाजाच्या नीतिमत्तेचें प्रतिबिंब

सरकार व काँग्रेस या शब्दांची आज गल्लत केली जात आहे. त्या दोघांत भेद पाहिला जात नाहीं. माझ्या मतें हें बरोबर नाहीं. सरकार म्हणजे केवळ काँग्रेस-मंत्री नव्हत. मध्यवर्ती प्रधानमंत्र्यांत तर, काँग्रेसच्या सभासद-मंत्र्यांच्या जोडीस काँग्रेसेतर मंत्रीहि बरेच आहेत. जेथें संपूर्ण मंत्रिमंडळें काँग्रेसची आहेत तेथेंहि त्यांच्या हातांखालचे चिटणीस, अधिकारी व नोकर काँग्रेसेतर, मागील राजवटींतील आहेत. कायदेमंडळांनीं लोकोपयोगी कायदे केले व ते अंमलांत आणण्यासाठीं मंत्र्यांनीं योजना केल्या तरी त्याची अंमलबजावणी करणारी नोकरशाही सर्वथैव चारित्र्यवान्, निरलस व समाजहिततत्पर असेलच असें नाहीं. गेल्या संकुल युद्धानंतर समाजाची नीतिमत्ता कमालीची हलकी झाली आहे. लोकांच्या उत्पन्नांत मोठी घट पडली आहे. खेड्यांतील उद्योगधंदे नाश पावले आहेत. मोठी जनसंख्या शहरांकडे धांव घेत आहे. सारें जीवनच निःसत्त्व झाल्यासारखें दिसत आहे. तेथें कायदा काय किंवा मंत्री काय, धर्म काय अथवा संघ काय, कोणाचेंच चालत नाहीं. आळस, अव्यवस्था, अप्रामाणिकपणा व पक्षपात यांचा झालेला राष्ट्रव्यापी फैलाव अडविण्याचें सामर्थ्य फक्त काळांतच आहे. यक्षिणीची कांडी फिरल्याप्रमाणें जादू होऊन राष्ट्रीय प्रकृति एका घटकेंत बदलणें शक्य नाहीं. ती बदलण्यास कांहीं काळ लागेल. रोम शहर एका दिवसांत बांधलें गेलें नव्हतें, अशी एक म्हण इंग्रजींत आहे. वर्षानुवर्षेंच काय पण शतकानुशतकें सांचलेली घाण काढून टाकून आपणांस एक नवीन आदर्श समाज निर्माण करावयाचा आहे. निर्मितीला वेळ लागतो. पण शांततेच्या मार्गानें निर्मिति लवकर होते हेंहि खरें आहे. लोकांची मात्र अनुकूल मनोवृत्ति पाहिजे.

राज्यतंत्रांत काँग्रेसनें लोकशाहीला मान्यता दिली आहे. अर्थातच समाजांतील बऱ्या-वाईट तत्त्वांचें प्रतिबिंब लोकांनीं निवडून दिलेल्या प्रतिनिधींमध्यें दिसून आल्याखेरीज राहाणार नाहीं. राजकीय किंवा आर्थिक संघटना ही समाजाच्या जीवनसिद्धान्तांवर आधारलेली असते. अर्थनीतीप्रमाणें धर्मनीति बनते. धर्मनीतीचा आग्रह धरणारे

तिच्या अनुषंगानें आपली अर्थनीति बदलण्यास मात्र तयार नसतात. काँग्रेसनें सर्वत्र आबादी-आबाद करून टाकावी असें म्हणणारे स्वतः आपल्या अधर्मानें मिळालेल्या संपत्तीवर पाणी सोडण्यास किंवा आपल्या वाममार्गाचा त्याग करण्यास तयार नसतात. समाजांतील विषमता, दुःख व दारिद्र्य यांचें कारण आपणहि अंशतः आहोंत व आपण स्वतः पश्चात्तापाभिमुख व अर्थव्यवहारांत निवृत्ति-परायण झाल्याशिवाय समाज सुधारणार नाहीं व इष्ट तो बदल घडून येणार नाहीं असें त्यांना वाटत नाहीं.

### काँग्रेसचें शांततेचें लोकशाही धोरण

पण समाजांत विचारी लोक नसले तरी काँग्रेसला अविचारी होऊन भागणार नाहीं. प्रथमपासून काँग्रेस आपल्या लोकशाही व शांततेच्या धोरणास चिकटून आहे. घटनापरिषदेंत व हिंदी लोकसभेंत तिनें आपल्या तिकिटांवर विद्वान्, विशेषज्ञ आणि चारित्र्यवान् अशा लोकसेवकांना देखील निवडून आणलें. घटनापरिषदेंत धर्मजातिवंश-भेदातीत राज्यपद्धतीचा पुरस्कार करून वयांत आलेल्या सर्व स्त्री-पुरुषांस मताधिकार बहाल केला. या सार्वत्रिक मताधिकारामुळें अडाणी मतदारांना आपल्याविरुद्ध भडकावून देऊन विरोधी बहुमतामुळें आपण अधि-कारच्युत होऊं ही भीति काँग्रेसच्या मनाला शिवली नाहीं. दारूबंदीसारखे कायदे पसार करतांना तिनें आर्थिक उत्पन्नाकडे पाहिलें नाहीं. शेतकऱ्यांच्या दुःखविमोचनासाठीं कायदे करतांना जमीनदार, खोत व मध्यमवर्गीय यांचा असंतोष विचारांत घेतला नाहीं. मजुरांचा दर्जा सुधारण्यासाठीं मालक-वर्गाचा रोष ओढून घेतला. " सर्वेषामविरोधेन " क्रांतिकर्म चालू ठेवणें शक्य नाहीं. परिस्थितींत बदल घडवून आणतांना समाजांतील वेगवेगळ्या थरांत स्थित्यंतरें झाल्याविना राहाणार नाहींत. आणि तसें न झालें तर आजची परिस्थिति तरी कशी पालटावी ?

### लोकशिक्षण हें शास्त्र आहे

नागरिक-स्वातंत्र्यावर गदा आल्याची ओरडहि काँग्रेसविरोधी लोक करीत असतात. काँग्रेसला चौकशीशिवाय व न्यायालयांत गुन्हा सिद्ध केल्या-शिवाय अनेक लोकांना पुष्कळ काळ तुरुंगांत डांबावें लागलें, ही खरोखर दुर्दैवाची गोष्ट आहे. विचारस्वातंत्र्य, भाषणस्वातंत्र्य व व्यक्तिस्वातंत्र्य हे शब्द गौरवशाली आहेत. त्यांचें पावित्र्य अबाधित राहिलें पाहिजे असा आग्रह कोणी धरल्यास तो बरोबर आहे. परंतु ' स्वातंत्र्य ' शब्दाचा अर्थ-हि बरोबर जाणून घेतला पाहिजे. स्वातंत्र्य म्हणजे अनियंत्रितपणा किंवा स्वच्छंद नव्हे ! संयमांतूनच स्वातंत्र्य मिळतें. आजकालच्या स्वातंत्र्याच्या व्याख्येंत संयम अनुस्यूत आहे काय, स्वतःच्या स्वातंत्र्याचा आग्रह धरणारे दुसऱ्याच्या स्वातंत्र्याची कदर करतात कांय, या गोष्टींचा विचार केला पाहिजे. आजकालचे वक्ते, लेखक व कार्यकर्ते स्वतःच्या मताशीं न जुळणाऱ्या मतांच्या पुरस्कर्त्यांबद्दल सहिष्णुता व आदर बाळगून असतात काय ? तसे पुष्कळदां नसतात. म्हणूनच त्यांतून संघर्ष निर्माण होतो. निरपराध लोकांना त्या संघर्षापासून ताप होतो व मग आर्तत्राणासाठीं सरकारला हातीं दंड धरावा लागतो. संयम राखून प्रचार करण्यास व लोकमत तयार करण्यास काँग्रेस सरकारनें मोकळीक ठेवली आहे. परंतु चळवळ्यांना तेवढा धीर कोठून ! आज राजकीय सत्तेसाठीं पुष्कळ उमेदवार पुढें सरसावले आहेत. सत्ता हातीं आल्यावर आपण आपणांशीं सहमत नसलेल्या राजकीय कार्यकर्त्यांशीं कसें वागूं याचा विचार कोणी करीत नाहीं. तसा ते करतील तर पुष्कळांच्या आजच्या दृष्टिबिंदूंत जरूर फरक पडेल असें मला वाटतें. आजकालच्या भाषणांतून व प्रचारात्मक लेखांतून गंभीर युक्तिवाद क्वचितच आढळतो. कोठल्याही राजकीय वा सामाजिक समस्यांचा मूलभूत व सर्वांगीण विचार करणारे लेखक व वक्ते फारच थोडे जगांत सांपड-तील. आणि म्हणूनच बहुतेकांचें लिखाण किंवा भाषणें जनतेला कांहीं तरी असमर्पक कारणें दाखवून त्यांचा भोळा विश्वास व संताप वाढविण्यास मदत करतात. सर्वसाधारण जनता प्रत्येक विधान तोलून बघत नाहीं; तसें शिक्षण तिला मिळालेलें नाहीं. तेव्हां ती भावनावेगांत जाते. आजची कठिण आर्थिक परिस्थिति अविवेकी प्रवृत्तींना मदत करणारी आहे. आणि क्षोभ प्रगट झाल्यास







त्यापासून नुकसानहि जनतेचेंच होतें म्हणून सरकारास सावध राहणें भाग पडतें. सरकारनें मुद्रण-स्वातंत्र्य व भाषणस्वातंत्र्य यांवर बंधन घालूं नये असें ज्यांना प्रामाणिकपणें वाटतें त्यांनीं आपल्या मत-प्रचारापासून समाजांत हिंसक क्षोभ निर्माण होणार नाहीं याची काळजी घ्यावी. लोकनियुक्त राज्य-तंत्रांत सरकार बदलून घेणें कठिण नाहीं. खरी अडचण सरकारवर अंकुश ठेवण्याची किंवा तें बदलण्याची नसून लोकांना समजाविण्याची आहे. कोठलेंहि चांगलें परिवर्तन घडवून आणण्यासाठीं आज लोकांतच उत्साह व तळमळ नाहीं. समाज जड बनला आहे असा भास होतो. स्वतःवरील जबाबदारीचें त्याला भानच नाहीं असें कित्येक वेळां वाटतें. तमोयुगांतून समाजाला वर आणतांना असा अनुभव येणें अपरिहार्य आहे.

बालशिक्षणाप्रमाणेंच लोकशिक्षण हें एक शास्त्र आहे. त्याचें तंत्र आपण महात्मा गांधींपासून शिकलों आहों. त्याचा आश्रय घेतल्याशिवाय तरणोपाय नाहीं.

### विधायक कार्यकर्ते काँग्रेसचें रूपांतर करतील

काँग्रेसनें स्वतःचें विसर्जन करून लोक-सेवकसंघांत रूपांतरित व्हावें अशी राष्ट्रपित्यांची अंतिम इच्छा होती. आजकाल काँग्रेसचे विरोधक या इच्छेच्या पूर्वार्धाला जितकें महत्त्व देतात तितकें उत्तरार्धाला देत नाहींत. कांत टाकण्याच्या कमाला कांहीं काळ लागतो. काँग्रेस ही ६५ वर्षांची संस्था आहे. तिचें रूपान्तर एका रात्रींत होणार नाहीं. जेव्हां तिची राष्ट्रीय गरज पुरी होईल तेव्हांच ती कांत टाकील. आज भारताच्या लोकसभेंत व निरनिराळ्या राज्यांच्या कायदेमंडळांतून जे प्रतिनिधी काँग्रेसच्या तिकीटांवर निवडून आले आहेत त्या सर्वांचा एक राजकीय पार्लमेंटरी पोटपक्ष आहे असें म्हणतां येईल. परंतु काँग्रेसनें केवळ पार्लमेंटरी पक्ष होऊन भागणार नाहीं. तिला अद्याप देशाच्या राष्ट्रीय जीवनांत सामाजिक व आर्थिक क्रांति घडवून आणावयाची आहे; अहिंसक समाजाची स्थापना करावयाची आहे. या ध्येयाच्या सिद्धीसाठीं प्रयत्न करीत असतांनाच हळूहळू काँग्रेसचें रूपांतर होत जाईल अशी माझी कल्पना आहे. मात्र ही गोष्ट शक्य तितक्या लवकर घडवून यावयाची असेल तर काँग्रेसनें आपलें स्वरूप केवळ पार्लमेंटरी कामाचें न ठेवतां विधायक कार्यास जीवन वाहून घेतलेल्या व महात्मा गांधीजींच्या विचारप्रणालीस संपूर्णपणें मानणाऱ्या लोकसेवकांना आपल्यांत प्रवेश दिला पाहिजे. पिठांत घातलेलें खमीर ज्याप्रमाणें निश्चितपणें आपलें कार्य करतें, त्याचप्रमाणें हे क्रांतिकारक कार्यकर्ते काँग्रेसचें रूपांतर घडवून आणतील. कायदे-मंडळांतून लोकहितवर्धक कायदे मंजूर करून घेण्यापूर्वी त्यांना अनुकूल लोकमत तयार करणें व कायदे मंजूर झाल्यावर लोकांनीं त्यांची अंमल-बजावणी करावी म्हणून जागरूकपणें त्यांना शिक्षण देत राहणें हीं दोन्हीं कामें जबाबदार लोकशाहीच्या दृष्टीनें फारच महत्त्वाचीं आहेत. प्रजेला आपला नागरिकधर्म पूर्णपणें बजावितां आला म्हणजे क्रांतीचें अर्धें-अधिक कार्य संपलें. पण त्या कार्या-साठीं काँग्रेसला विधायक कार्य खूपच करावें लागणार आहे. जीवनांतील क्षुद्र चिंता व त्रास काळानें नाहींसे होतील. पण प्रचंड अरिष्टें जीं मृत्यु, दुःख, निष्ठुरपणा आणि युद्ध, त्यांचा सामना करणें हें फार महत्त्वाचें काम आहे. हें काम परंपरागत कार्यपद्धतीनें तडीस जाणार नाहीं. आज समाजांत जे वेगवेगळे आत्मसंतुष्ट गट दिसतात ते मानवी जीवनाकडे समग्रपणें पाहूं शकत नाहींत. आपला हेका सोडण्याऐवजीं संस्कृतींचा नायनाट करण्यास ते उद्युक्त होतील. मानवी अरिष्टांचा परिहार करण्याचा अधिकार व शक्ति अशांना नाहीं. अरिष्टांपासून पळून जाणें भेकडपणाचें आहे. त्यांचा सामना करण्यास इच्छाशक्ति पाहिजे. पण ती समजून घेण्यासाठीं कल्पनाशक्ति व बुद्धि यांचीहि गरज आहे. त्यानंतर त्यावर उपाय शोधणें सुलभ जातें. पण उपाय कळून चुकले तरी ते अंमलांत आणण्यास व अंमलांत आल्यावर त्यांचा परिणाम दिसून येण्यास कांहीं काळाची जरूरी असते. या मधल्या काळांत अपरिहार्य म्हणून अरिष्टें सहन करण्यासाठीं अंगीं तितिक्षा व समतोल वृत्ति लागते. अशा वेळीं भूतकालाकडे नजर टाकल्यास पुष्कळ प्रेरणा मिळूं शकते व भविष्याबद्दल मनांत आशा निर्माण होते.





अनुक्रमणिका

श्री. श्री. म. जोशी

# कॉंग्रेसबद्दलच्या माझ्या वैचारिक प्रतिक्रिया

कॉंग्रेसचा जयजयकार करण्यांत माझ्या ऐन तारुण्यांतील जवळजवळ सतरा वर्षे गेलीं. " इन्किलाब जिंदाबाद, थोडे दिनमें कॉंग्रेस राज " ही घोषणा देखील एके काळीं मी अगदीं मनापासून ओरडत असें. आज कॉंग्रेसचेंच राज्य चालूं आहे. परंतु माझ्या मनाचें समाधान झालेलें नाहीं. कॉंग्रेसच्या छत्राखालीं मी लहानाचा मोठा झालों. परंतु कॉंग्रेसवरच मला आतां कठोर टीका करावी लागत आहे. नुसती टीकाच नव्हे तर, कॉंग्रेसचा त्याग करून मी आतां विरोधी पक्षांत उभा आहें. अशा या विचित्र परिस्थितींत कॉंग्रेसबाबतच्या माझ्या मानसिक प्रतिक्रियांच्या मागोवा घेणें उद्‌बोधक होईलसें वाटतें.

## आमच्या लढाऊ आकांक्षा

कॉंग्रेसच्या झेंड्याखालीं १९२० सालीं असहकारितेची चळवळ झाली. त्या वेळीं मी एक लहान शाळकरी मुलगा होतों. त्या वेळीं आमच्या आजूबाजूचें वातावरण अगदीं गरम झालें होतें. बरोबरीचे किती तरी शाळासोबती परधार्जिण्या शिक्षणावर बहिष्कार घालून राष्ट्रीय शाळेंत दाखल झाले. त्यांचे पालक कॉंग्रेसनिष्ठ होते. मला मात्र प्रतिकूल परिस्थितीमुळें माझ्या देशप्रेमाच्या ऊर्मी तशाच दडपून टाकाव्या लागल्या. पण त्यामुळें राष्ट्रीय चळवळीबद्दलचें माझें आकर्षण कमी होण्याऐवजीं अधिकच वाढलें. कॉंग्रेसचें नांव त्या वेळीं विशेष महत्त्वाचें नव्हतें. महात्मा गांधी आणि अन्य राष्ट्रीय पुढारी हेच आमच्या डोळ्यांपुढें असत.

पुढें असहकारितेच्या चळवळीचा भर ओसरला. कॉंग्रेसमध्यें फेरवाले-नाफेरवाले असे वाद सुरूं झाले. माझें राष्ट्रीय चळवळीबद्दलचें प्रेमहि ओसरलें. युसुफ मेहेरअली, नेताजी सुभाषचंद्र बोस, आणि पंडित जवाहरलाल नेहरू यांच्या प्रेरणेनें चालणाऱ्या युवक चळवळीकडे मी आकृष्ट झालों. आम्ही पूर्ण स्वातंत्र्याचे उपासक होतों; आम्हांला कॉंग्रेसचें वसाहतीचें स्वराज्य मुळींच पसंत नव्हतें; शांततेच्या मार्गानें स्वातंत्र्य मिळेल या गोष्टीवर आमचा विश्वास बसणें शक्यच नव्हतें. अशा परिस्थितींत मला कॉंग्रेसचा सभासद होण्याचें काय कारण होतें ?

परंतु महात्मा गांधींनीं तरुणांच्या आकांक्षा आणि कोट्यवधि जनतेची भूक ओळखली. संपूर्ण स्वातंत्र्याच्या ध्येयास पाठिंबा देऊन पंडित जवाहरलाल नेहरू यांची कॉंग्रेसच्या अध्यक्षपदीं निवड होईल असा बनाव बनवून आणला. इतकेंच नव्हे तर सत्याग्रहाचा लढा सुरूं करून त्यांनीं सम्राज्यशाहीला आह्वान दिलें.

आम्ही तरुण मंडळी कॉंग्रेसच्या झेंड्याखालीं सुरूं झालेल्या सत्याग्रह-लढ्यांत सामील झालों. हिंसा-अहिंसेचा प्रश्न होता. शांततेच्या मार्गानें संपूर्ण स्वातंत्र्याचें आपलें उद्दिष्ट प्राप्त होईल असें आम्हांला अजूनहि वाटलें नव्हतें. कारण युवक-संघाचा चिटणीस या नात्यानें तरुणांना लढ्यांत सामील होण्यासाठीं हांक देणारें पत्रक मीं काढलें तें मला अजूनहि चांगलें आठवतें. पत्रकाची सुरुवातच, बॅ. सावरकरांनीं दिलेली स्फूर्ति अद्याप विसरलेली नाहीं, अशा वाक्यानें केली होती. कॉंग्रेसनें तर न्याय्य आणि शांततेच्या मार्गांनीं स्वातंत्र्य मिळविण्याचें आपलें तत्त्व सोडलेलें नव्हतें. परंतु कायदेभंगाच्या चळवळीनें आमच्या लढाऊ आकांक्षांना वाव मिळाला असल्या-







मुळें आम्हीं तो प्रश्न जरा बाजूला ठेवला. कायदेभंगाच्या चळवळीचा विस्तार आणि जोर हळूंहळूं वाढत जाऊन जनता बंड करून उठेल, मग त्यांत हिंदी लष्करहि सामील होऊन देशांत क्रांति होईल आणि परकीय सत्तेला मूठमाती मिळून संपूर्ण स्वातंत्र्याची प्रस्थापना होईल अशी आशा त्या पत्रकाच्या शेवटीं मी व्यक्त केली होती. सशस्त्र क्रान्तीचीं गोड स्वप्नें, पाहत पाहतच आम्हीं सत्याग्रह-लढ्यांत उतरलों होतों. स्वातंत्र्याच्या सामाजिक अंगावर आमचें विशेष लक्ष नव्हतें. पंडित जवाहरलाल नेहरूंनीं युवक परिषदेचे अध्यक्ष म्हणून केलेल्या भाषणांत समाजवादी ध्येयाचा पुरस्कार केला होता. परंतु त्या गोष्टीचें महत्त्व त्या वेळीं आमच्या ध्यानांत आलें नव्हतें. त्याची महती पटण्यास तुरुंगांतील दोन-अडीच वर्षांच्या अध्ययन-चिंतनाची आवश्यकता होती.

### काँग्रेस-समाजवादी-पक्षाचा जन्म

कायदेभंगाच्या लढ्यांत शिक्षा होऊन आम्ही तुरुंगांत गेलों आणि जनतेच्या क्रान्तिकारक उठावाचीं आमचीं स्वप्नें हळूहळू हवेंत विरून जातांना आम्हीं पाहिलीं. आम्हीं विचार करूं लागलों. अन्य देशांच्या स्वातंत्र्यलढ्यांचे इतिहास वाचले. आणि जनतेनें उठाव कां केला नाहीं याचीं कारणें आम्हांला सांपडलीं. स्वातंत्र्याची सामाजिक बाजू स्पष्ट होत नाहीं तोंवर जनतेला लढ्याबद्दल उत्साह कसा वाटेल? अन्नवस्त्राच्या त्यांच्या दैनंदिन अडचणी दूर करण्यासाठीं आम्हीं पुढें सरसावलों तरच त्यांना कांहीं तरी करावें असा उत्साह वाटणार. स्वातंत्र्याचा अर्थ त्यांच्या अडी-अडचणींच्या आणि त्यांच्यावर होणाऱ्या अन्यायाच्या भाषेंत मांडला तरच त्यांना समजूं शकेल हें सत्य आम्हांला सांपडलें. काँग्रेसच्या साम्राज्यविरोधी लढ्याच्या कमजोरीबद्दल आम्ही आपले आडाखे बांधले आणि तुरुंगांतून बाहेर आल्यावर काँग्रेस-समाजवादी पक्षाची स्थापना केली. मी काँग्रेस-समाजवादी-पक्षाचा सभासद झालों.

काँग्रेसबद्दल उदासीन होण्याचा हा दुसरा प्रसंग होता. असहकारितेच्या चळवळीची लाट ओसरल्यानंतरहि काँग्रेस मनांतून उतरली होती. परंतु त्या वेळची प्रतिक्रिया सर्वस्वीं भावनात्मक होती. या वेळची प्रतिक्रिया प्रामुख्यानें वैचारिक स्वरूपाची होती. साम्राज्यविरोधी लढ्याची मीमांसा शास्त्रीय दृष्टिकोणांतून करावयास पाहिजे, वर्गीय जागृतीच्या खंबीर पायावरच त्याची उभारणी केली जाणें आवश्यक आहे, आणि त्या दृष्टीनें काँग्रेसचें नेतृत्व अपुरें पडत आहे, या जाणिवांतूनच काँग्रेस-समाजवादी-पक्ष उदयास आला. राष्ट्रीय चळवळीचा उपयोग हिंदी भांडवलदारवर्ग आपल्या नफेबाजीसाठीं करून घेतो आणि काँग्रेसचे पुढारीदेखील जमीनदार-भांडवलदारांच्या वर्गीय हितसंबंधांचा अधिक सहानुभूतीनें विचार करतात असें आमचें प्रतिपादन होतें. किसानांच्या वर्गीय संघटनांना आणि लढ्यांना अधिकारारूढ काँग्रेस-कडून जो विरोध होई त्यामुळें आमच्या प्रतिपादनास दुजोरा मिळे. जातिधर्मनिरपेक्ष राष्ट्रवादाचें काँग्रेसचें ध्येय होतें. परंतु जोंवर आर्थिक आणि वर्गीय पायावर जनतेची संघटना करून स्वातंत्र्याचा सामाजिक अर्थ तिला समजावून दिला जात नाहीं तोंपर्यंत अजातीय राष्ट्रवादाच्या या घोषणा व्यर्थ आहेत असाहि आमचा आक्षेप होता. आर्थिक पायावर जनसंघटना केली तरच जातीय भांडणें लावून देण्याच्या साम्राज्यवादी डावाला जनता बळी पडणार नाहीं असा आमचा दावा होता. परंतु काँग्रेसच्या पुढाऱ्यांनीं त्याची पर्वा केली नाहीं. सारांश, साम्राज्यविरोधी मोर्चा अधिक व्यापक आणि मजबूत कसा करावा, त्यामध्यें कोणत्या वर्गाकडे अधिक लक्ष द्यावें, कोणते वर्ग स्वातंत्र्यविरोधी आहेत, इत्यादि गोष्टींबाबतच आमचे मतभेद होते. निराळ्या शब्दांत सांगावयाचें झाल्यास क्रान्तितंत्राच्या दृष्टीनें काँग्रेसचा दृष्टिकोण अशास्त्रीय आहे असा आमचा मुख्य आक्षेप होता.

त्या वेळीं रशियन क्रान्तीची आणि तेथें चालू असलेल्या समाजवादी प्रयोगाचीं आकर्षक चित्रें रंगविणारीं पुस्तकें आम्हीं वाचीत होतों. कार्ल मार्क्सच्या ज्या शास्त्रीय समाजवादाच्या आधारें रशियन क्रान्ति लेनिननें यशस्वी केली त्या मार्क्सवादाचा अभ्यास आम्हीं केला. आम्हांला तो दृष्टिकोण पटला आणि आम्ही मार्क्सवादी बनलों. मार्क्सवादाच्या दृष्टिकोणांतून हिंदुस्थानांतील










अनुक्रमणिका

मुळें आम्हीं तो प्रश्न जरा बाजूला टेवला. कायदे-भंगाच्या चळवळीचा विस्तार आणि जोर हळूंहळूं वाढत जाऊन जनता बंड करून उठेल, मग त्यांत हिंदी लष्करहि सामील होऊन देशांत क्रांति होईल आणि परकीद सत्तेला मूठमाती मिळून संपूर्ण स्वातंत्र्या-ची प्रस्थापना होईल अशी आशा त्या पत्रकाच्या वेळीं मी व्यक्त केली होती. सशस्त्र क्रान्तीचीं गोड स्वप्नें, पाहत पाहतच आम्हीं सत्याग्रह-लढ्यांत उतरलों होतों. स्वातंत्र्याच्या सामाजिक अंगावर आमचें विशेष लक्ष नव्हतें. पंडित जवाहरलाल नेहरूंनीं युवक परिषदेचे अध्यक्ष म्हणून केलेल्या भाषणांत समाजवादी ध्येयाचा पुरस्कार केला होता. परंतु त्या गोष्टीचें महत्त्व त्या वेळीं आमच्या ध्यानांत आलें नव्हतें. त्याची महती पटण्यास तुरुंगांतील दोन-अडीच वर्षांच्या अध्ययन-चिंतनाची आवश्यकता होती.

## काँग्रेस-समाजवादी-पक्षाचा जन्म

कायदेभंगाच्या लढ्यांत शिक्षा होऊन आम्ही तुरुंगांत गेलों आणि जनतेच्या क्रान्तिकारक उठा-वाचीं आमचीं स्वप्नें हळूहळू हवेंत विरून जातांना आम्हीं पाहिलीं. आम्हीं विचार करूं लागलों. अन्य देशांच्या स्वातंत्र्यलढ्यांचे इतिहास वाचले. आणि जनतेनें उठाव कां केला नाहीं याचीं कारणें आम्हांला सांपडलीं. स्वातंत्र्याची सामाजिक बाजू स्पष्ट होत नाहीं तोंवर जनतेला लढ्याबद्दल उत्साह कसा वाटेल? अन्नवस्त्राच्या त्यांच्या दैनंदिन अडचणी दूर करण्यासाठीं आम्हीं पुढें सरसावलों तरच त्यांना कांहीं तरी करावें असा उत्साह वाटणार. स्वातंत्र्याचा अर्थ त्यांच्या अडी-अडचणींच्या आणि त्यांच्यावर होणाऱ्या अन्यायाच्या भाषेंत मांडला तरच त्यांना समजूं शकेल हें सत्य आम्हांला सांपडलें. काँग्रेसच्या साम्राज्यविरोधी लढ्याच्या कमजोरीबद्दल आम्ही आपले आडाखे बांधले आणि तुरुंगांतून बाहेर आल्यावर काँग्रेस-समाजवादी पक्षाची स्थापना केली. मी काँग्रेस-समाजवादी-पक्षाचा सभासद झालों.

काँग्रेसबद्दल उदासीन होण्याचा हा दुसरा प्रसंग होता. असहकारितेच्या चळवळीची लाट ओसरल्यानंतरहि काँग्रेस मनांतून उतरली होती. परंतु त्या वेळची प्रतिक्रिया सर्वस्वीं भावनात्मक होती. या वेळची प्रतिक्रिया प्रामुख्यानें वैचारिक स्वरूपाची होती. साम्राज्यविरोधी लढ्याची मीमांसा शास्त्रीय दृष्टिकोणांतून करावयास पाहिजे, वर्गीय जागृतीच्या खंबीर पायावरच त्याची उभा-रणी केली जाणें आवश्यक आहे, आणि त्या दृष्टीनें काँग्रेसचें नेतृत्व अपुरें पडत आहे, या जाणिवांतूनच काँग्रेस-समाजवादी-पक्ष उदयास आला. राष्ट्रीय चळवळीचा उपयोग हिंदी भांडवलदारवर्ग आपल्या नफेबाजीसाठीं करून घेतो आणि काँग्रेसचे पुढारीदेखील जमीनदार-भांडवलदारांच्या वर्गीय हितसंबंधांचा अधिक सहानुभूतीनें विचार करतात असें आमचें प्रतिपादन होतें. किसानांच्या वर्गीय संघटनांना आणि लढ्यांना अधिकारारूढ काँग्रेस-कडून जो विरोध होई त्यामुळें आमच्या प्रतिपादनास दुजोरा मिळे. जातिधर्मनिरपेक्ष राष्ट्रवादाचें काँग्रेसचें ध्येय होतें. परंतु जोंवर आर्थिक आणि वर्गीय पायावर जनतेची संघटना करून स्वातंत्र्याचा सामाजिक अर्थ तिला समजावून दिला जात नाहीं तोंपर्यंत अजातीय राष्ट्रवादाच्या या घोषणा व्यर्थ आहेत असाहि आमचा आक्षेप होता. आर्थिक पायावर जनसंघटना केली तरच जातीय भांडणें लावून देण्याच्या साम्राज्यवादी डावाला जनता बळी पडणार नाहीं असा आमचा दावा होता. परंतु काँग्रेसच्या पुढाऱ्यांनीं त्याची पर्वा केली नाहीं. सारांश, साम्राज्यविरोधी मोर्चा अधिक व्यापक आणि मजबूत कसा करावा, त्यामध्यें कोणत्या वर्गांकडे अधिक लक्ष द्यावें, कोणते वर्ग स्वातंत्र्यविरोधी आहेत, इत्यादि गोष्टींबाबतच आमचे मतभेद होते. निराळ्या शब्दांत सांगावयाचें झाल्यास क्रान्ति-तंत्राच्या दृष्टीनें काँग्रेसचा दृष्टिकोण अशास्त्रीय आहे असा आमचा मुख्य आक्षेप होता.

त्या वेळीं रशियन क्रान्तीची आणि तेथें चालू असलेल्या समाजवादी प्रयोगाची आकर्षक चित्रें रंगविणारीं पुस्तकें आम्हीं वाचीत होतों. कार्ल मार्क्सच्या ज्या शास्त्रीय समाजवादाच्या आधारें रशियन क्रान्ति लेनिननें यशस्वी केली त्या मार्क्स-वादाचा अभ्यास आम्हीं केला. आम्हांला तो दृष्टि-कोण पटला आणि आम्ही मार्क्सवादी बनलों. मार्क्सवादाच्या दृष्टिकोणांतून हिंदुस्थानांतील







# काँग्रेसबद्दलच्या माझ्या वैचारिक प्रतिक्रिया

परिस्थितीचा अभ्यास करण्याच्या दृष्टीनें एम्. एन्. रॉय यांच्या लिखाणाचा मला फार उपयोग झाला. मार्क्सवादावर आधारलेल्या कम्युनिस्ट पक्षाचा त्यावेळीं बराच बोलबाला होता. मीरत कटाचा खटला गाजला होता. परंतु राष्ट्रीय चळवळीपासून अलिप्त रहाण्याचें किंबहुना तिला विरोध करण्याचें त्याचें धोरण मला मानवण्यासारखें नव्हतें. तथापि एम्. एन्. रॉय यांचीं पुस्तकें मला वाचावयास मिळालीं नसतीं तर काँग्रेससंबंधींच्या औदासीन्याच्या भरांत मी कम्युनिस्ट पक्षांतहि सामील झालों असतों. काँग्रेसचें सभासद होणें देखील कम्युनिस्टांना त्या वेळीं पसंत नव्हतें. तसें नसतें तर काँग्रेस-समाजवादी-पक्षाची स्थापना तरी झाली असती किंवा नाहीं याबद्दल मला शंका आहे. आणि मग काय झालें असतें हें सांगणें फार कठिण आहे.

## जहाल मतवाद्यांचा तेजोभंग

परंतु तसें कांहीं घडलें नाहीं. साम्राज्यशाहीच्या टांचेखालीं असलेल्या वसाहतीच्या देशांतील राष्ट्रीय स्वातंत्र्याचा लढा प्रतिगामी नसून पुरोगामी असतो हें तत्त्व आम्हांला पटलेलें असल्यामुळें आम्हीं काँग्रेस-मध्येंच राहून काम करीत राहिलों. राष्ट्रीय स्वातंत्र्याचा प्रश्न निकालांत निघेपर्यंत काँग्रेसमध्यें रहावयाचें आम्हीं निश्चित केलें होतें. आंत राहून स्वातंत्र्याच्या लढ्याला खऱ्या अर्थानें साम्राज्यविरोधी बनविण्याचा आम्हीं प्रयत्न करीत होतों. बहुसंख्य जनता काँग्रेसच्या झेंड्याखालीं येईल आणि तिच्यांत वर्गीय जागृति झालेली असेल तर, साम्राज्यविरोधी लढ्यांतून उदयास येणाऱ्या स्वातंत्र्याचा उपयोग हळूंहळूं समाजक्रान्तीसाठीं देखील करून घेतां येईल अशी उमेदहि आम्हीं बाळगली होती. ही आमची आशा खरी ठरली नाहीं हें प्रांजलपणें कबूल केलें पाहिजे.

सन १९३७ मध्यें काँग्रेसनें प्रांतामध्यें मंत्रि-पदांचा स्वीकार केला आणि काँग्रेसचें स्वरूप झपाट्यानें बदलूं लागलें. सत्तेचा वापर आपल्या वर्गीय स्वार्थासाठीं करून घेण्याच्या महत्त्वाकांक्षेनें पूर्वी काँग्रेसला विरोध करणारे लोक आणि वर्गहि काँग्रेस-मध्यें शिरले. त्यांचें स्वागत करण्यांत आलें. एवढेंच नाहीं तर, मंत्रिमंडळांचीं धोरणें देखील या वर्गांना पोषक आणि दडपलेल्या वर्गांना जाचक अशीं होऊं लागलीं. आपलीं दुःखें वेशीवर टांगण्यासाठीं आणि आपल्या मागण्या विधिमंडळाला सांगण्यासाठीं काढण्यांत आलेल्या शेतकरी मोर्चालादेखील काँग्रेस विरोध करूं लागली. बिहारमध्यें जमीन-दारांनीं बेकायदेशीरपणें दडपलेल्या जमिनी परत मिळाव्या म्हणून किसानांनीं सत्याग्रह केले, तर काँग्रेस श्रेष्ठींचा संताप झाला आणि वर्किंग कमिटीच्या अनुमतीशिवाय सत्याग्रह करणें नियमबाह्य ठर-विण्यांत आलें. संस्थानिकांविरुद्ध संस्थानी प्रजेचे लढे चालत. त्यांची झळ काँग्रेसला लागूं नये म्हणून संस्थानी विभागांतील काँग्रेस-कमिट्यांचे मुख्य काँग्रेसपासून संबंध तोडण्यांत आले. संस्थानी प्रजेच्या स्वतंत्र संघटना करण्याच्या धोरणास प्रोत्साहन देण्यांत आलें.

काँग्रेसचें लढाऊ कार्यक्रमाबद्दलचें धोरण हें असें होतें. मुस्लिम लीगनेंदेखील या संधीचा फायदा घेऊन प्रतिगामी शक्तींच्या वाढीस फार मोठी चालना दिली. सर्व सत्ता काँग्रेस मंत्रिमंडळांच्या द्वारें हिंदूंनीं आपल्या हातांत घेतली आहे अशा प्रचार करून मुस्लिम जनतेंत जातीयतेचें रान उठवून दिलें. सार्वत्रिक निवडणुकींत एकाहि प्रांतांत मुस्लिम लीगला बहुमत नव्हतें. परंतु अवघ्या दोन वर्षांच्या काळांत बहुसंख्य मुसलमान लीगच्या झेंड्याखालीं जमा झाले. काँग्रेसच्या साम्राज्यविरोधी एकजुटींत हें भलें मोठें खिंडार होतें ! ब्रिटिश साम्राज्यवादी मुत्सद्द्यांनीं काँग्रेसवर मात केली यांत शंका नाहीं.

मंत्रिमंडळाच्या या कालखंडांत काँग्रेसकडून काँग्रेसमधील जहालमतवाद्यांचा तेजोभंग करण्याचा प्रयत्न सतत चालूं राहिला. काँग्रेसश्रेष्ठींच्या विरुद्ध निवडणूक लढवून नेताजी सुभाष बोस काँग्रेसच्या अध्यक्षपदीं निवडून आले. लोकमत लक्षांत घेऊन त्यांच्या बरोबर तडजोड होणें हितावह ठरलें असतें; परंतु तें घडलें नाहीं. परिस्थिति हळूंहळूं इतकी बिघडत गेली कीं, एके वेळीं तर इतःपर काँग्रेस-कडून स्वातंत्र्यार्थ लढा होऊं शकेल कीं नाहीं या-बद्दलच शंका वाटूं लागली.

## १९४२ चा क्रान्तिकारक लढा

परंतु याच सुमारास दुसरें महायुद्ध सुरू झालें.

पंडित जवाहरलाल नेहरू यांनीं चालविलेल्या
परराष्ट्रीय धोरणामुळें आणि गांधीजींच्या अहिंसा-
तत्त्वामुळें काँग्रेसला युद्धविरोधाची भूमिका घेणें
भागच पडलें आणि मंत्रिमंडळाच्या या खोड्यांतून
काँग्रेसची सुटका झाली. पुढें सोव्हिएट यूनियनवर
हिट्लरनें हल्ला चढवला तेव्हां फिरून एक वेळ
काँग्रेसच्या भूमिकेंत डळमळीतपणा निर्माण झाला.
साम्राज्यवादी युद्ध लोकयुद्ध झालें म्हणून कम्यु-
निस्ट तर सरळ सरळ युद्धसहकार्याचा प्रचार
करूं लागले. या संधीचा फायदा घेऊन ब्रिटिश
सरकारनें क्रिप्सला बोलणीं करण्यासाठीं पाठविलें;
परंतु त्याची शिष्टाई निष्फळ ठरून गांधीजींनीं
इतिहासप्रसिद्ध "छोडो हिंदुस्थान" चळवळीचा
सूत्रपात केला. समाजवादी पक्षाची काँग्रेसबद्दलची
आशास फळ होऊन काँग्रेसच्या झेंडयाखालीं
बेचाळीसचा क्रांतिकारक लढा लढला गेला.

बेचाळीसच्या संग्रामांत काँग्रेसबद्दल मला वाटणारें
प्रेम शिगेला पोंचलें होतें. जनक्रान्तीचें माझें स्वप्न
त्या लढ्याच्या रूपानें साकार होऊं लागलें होतें.
समाजवादी पक्षानें लढ्याच्या काळांतहि आपली
स्वतंत्र संघटना चालू ठेवावी असा एक विचारप्रवाह
होता. परंतु मला तो रुचला नाहीं. लढयाचें नेतृत्व
करण्यांत अग्रभागीं असलेल्या समाजवादी
पुढाऱ्यांनींदेखील ही सूचना मान्य केली नाहीं.

ऑगस्टमध्यें सुरू झालेली ही क्रांति अपुरी राह-
णार नाहीं, जनतेचे प्रश्न सोडविण्यास समर्थ अशी
समाजव्यवस्था निर्माण करण्याचें ऐतिहासिक कार्य
या क्रान्तींतून होईल अशा आशेनेंच आम्ही काम
करीत होतों. परंतु काँग्रेसच्या पुढाऱ्यांनीं महात्मा
गांधींची अनुमति नसतांनादेखील पाकिस्तानच्या
मुद्दयावर तडजोड करून "मौंटबॅटन-योजना" मान्य
केली. पाकिस्तान आणि भारत असे देशाचे दोन
तुकडे पडले. जातीय प्रश्न सलोख्यानें सुटून दोन्हीं
राज्यांतील जनतेच्या प्रगतीचा मार्ग मोकळा व्हावा
म्हणून केलेल्या या तडजोडीनें तो प्रश्न सुटला नाहीं.
जातीय दंगे, खून, जाळपोळ, अत्याचार बेसुमार
झाले. निर्वासितांचा भयंकर प्रश्न अकल्पितपणें उभा
राहिला. काश्मीरच्या लढाईंत हिंदुस्थानला पडावेंच
लागलें. स्वातंत्र्याचें तांबडें फुटतें न फुटतें तोंच गडद
अंधःकार माजला. आणि त्यांतच विश्ववंद्य राष्ट्र-
पित्याचा अमानुषपणें खून करण्यांत आला.

### महात्माजींची दूरदर्शीपणाची सूचना

स्वातंत्र्य मिळाल्यावर समाजक्रान्तीचा कार्यक्रम
हातीं घेतला जाईल अशी आमची कल्पना होती.
त्यासाठींच काँग्रेसमध्यें राहून आम्ही धडपडत होतों;
जनतेची संघटना करण्याचा प्रयत्न करीत होतों.
बेचाळीसच्या लढ्यांत अग्रभागीं राहिल्यामुळें समाज-
वादी पक्षाची लोकप्रियता पुष्कळच वाढली होती.
परंतु काँग्रेसमधील कांहीं पुढाऱ्यांना तें मानवलें
नाहीं. समाजवाद्यांचा हेवा-दावा करणारांचे दोन वर्ग
करतां येतील. दुय्यम दर्जाच्या पुढाऱ्यांना समाज-
वादी पक्षाच्या पुढाऱ्यांच्या लोकप्रियतेबद्दल हेवा
वाटला तर कांहीं पुढाऱ्यांचा समाजवादी ध्येयालाच
विरोध होता. खाजगी उद्योगधंद्यांच्यामार्फतच देशाची
औद्योगिक प्रगति होऊं शकेल असें त्यांना
वाटतें. आम्हांला उद्योगधंद्यांचें राष्ट्रीयीकरण करा-
वयाचें नाहीं आणि आमच्याजवळ तितकी शक्तीहि
नाहीं असें ते उघडपणें बोलून दाखवितात. परंतु
आपले हे विचार जनतेला पसंत नाहींत हें
त्यांना कळून चुकलें होतें. अशा परिस्थितींत फाळणी-
मुळें निर्माण झालेल्या जातीय असंतोषावर पुष्ट
झालेल्या संस्थांना चुचकारण्यासहि त्यांनीं कमी केलें
नाहीं. त्यांचें हें धोरण अधिकारारूढ काँग्रेसमधीलहि
पुष्कळ लोकांना मान्य नव्हतें. तरी पण समाज-
वाद्यांच्या विरुद्ध मात्र सर्वांची एकजूट होती हें
विसरून चालणार नाहीं.

महात्मा गांधी हयात होते तोंपर्यंत समाज-
वाद्यांना काँग्रेसमध्येंच रहातां यावें असा त्यांनीं
प्रयत्न केला. काँग्रेसनें आपल्या कार्यक्रमांत आवश्यक
ती सुधारणा करून या लोकांना आत्मसात्
करावें अशी त्यांची कल्पना होती. वसाहतीच्या
स्वराज्यासाठीं झगडणाऱ्या काँग्रेसला जसें त्यांनीं
स्वातंत्र्यवादी बनविलें तसेंच आतां काँग्रेसला
समाजवादाची दीक्षा देण्याचा त्यांचा मानस होता.
समाजवादाचीं तत्त्वें त्यांना शंभर टक्के मान्य होती
असें म्हणतां येणार नाहीं. परंतु काँग्रेस ज्या राजकीय
भूमिकेवरून काम करीत आहे ती लक्षांत घेतां
आजच्या युगांत तिला लोकशाही समाजवादाचा



अनुक्रमणिका

# कॉँग्रेसबद्दलच्या माझ्या वैचारिक प्रतिक्रिया

अंगीकार केल्यावांचून गत्यंतर नाहीं हें त्यांनीं ओळखलें होतें. म्हणूनच त्यांनीं आचार्य नरेंद्रदेव अथवा जयप्रकाश नारायण यांचीं नांवें कॉँग्रेसच्या अध्यक्ष-पदासाठीं सुचविलीं होतीं. प्रथम-श्रेणीची सर्व वडील-धारी माणसें मंत्रिमंडळांत गेल्यानें कॉँग्रेसचा अध्यक्ष निवडतांना आजकाल कशी तारांबळ उडते तें पाहिलें म्हणजे महात्माजींची सूचना किती दूरदर्शी-पणाची होती हें कळून येतें. परंतु अधिकारारूढ गटांतील बहुसंख्य कॉँग्रेस पुढाऱ्यांना गांधीजींचें हें धोरण पसंत पडण्यासारखें नव्हतें. तुरुंगांतून बाहेर पडल्याबरोबरच त्यांनीं समाजवाद्यांना नामोहरम करण्याचा प्रयत्न सुरू केला. कित्येकांनीं तर तुरुंगांत असतांनाच त्याबद्दलच्या योजना आंखून ठेवल्या होत्या.

## आम्ही कॉँग्रेसबाहेर कां पडलों ?

बेचाळीसच्या लढ्यांत भाग घेतलेल्या बऱ्याचशा तरुणांनीं कम्युनिस्टांच्या धोरणाला विरोध करून राष्ट्रीय मिल-मजदूर-संघामध्यें कार्य करण्यास सुरुवात केली होती. हळूहळू कामगारांची कम्युनिस्टविरोधी आघाडी प्रभावी होऊं लागली होती. तरुण पिढीमध्यें नव्या दमाचे कार्यकर्ते तयार करण्याचें काम महाराष्ट्रांत आणि मुंबईत राष्ट्रसेवादलामार्फत होत होतें. १९४१-४२ पासून जातीयवाद्यांना तोंड देण्यास कार्यक्षम अशी तरुणांची आघाडी तयार होत होती. नव्या जमान्यां-तील प्रश्न सोडविण्याच्या दृष्टीनें कॉँग्रेसचा कायापालट करण्यासाठीं याच मार्गाचा अवलंब करणें आवश्यक होतें. परंतु या सर्व तरुण कार्यकर्त्यांना बेचाळीसच्या क्रान्तिकारकांबद्दल आणि समाजवादी पुढाऱ्यांबद्दल आदर आणि जिव्हाळा वाटे, ही गोष्ट महाराष्ट्र-आणि-मुंबईच्या कॉँग्रेस पुढाऱ्यांना रुचली नाहीं.

राष्ट्रीय मजदूर-संघामध्यें या मंडळींचें बहुमत होऊं नये म्हणून घटनात्मक अडचणी उपस्थित करून त्यांना निवडणुकीस उभें राहतां येणार नाहीं अशी कारवाई करण्यांत आली आणि राष्ट्रसेवादलावर आपली संपूर्ण हुकमत चालवून समाजवादी विचा-रांच्या कार्यकर्त्यांना त्यांतून हुसकून काढतां यावें अशा प्रकारचे डावपेंच महाराष्ट्रांत होऊं लागले. राष्ट्रसेवादलाच्या घटनेंत आम्ही म्हणतों तसा बदल झालाच पाहिजे असा आग्रह कॉँग्रेस-श्रेष्ठींनीं धरला आणि प्रांतिक कॉँग्रेस-कमिटींतील आपल्या हुकमी बहुमताच्या जोरावर तसा ठरावहि पास करून घेतला. कॉँग्रेसची हुकूमशाही मान्य करण्याऐवजीं कॉँग्रेस-पासून अलग होण्याचेंच सेवादलांतील बहुसंख्य कार्य-कर्त्यांनीं पसंत केलें. आणि समाजवादी विचाराच्या मुंबई कामगारांनीं आपली स्वतंत्र मिल-मजदूर-सभा काढली. समाजवादी पक्ष कॉँग्रेसमधून बाहेर पडला नव्हता त्या वेळच्या या घटना आहेत हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

या घटनांचा माझ्या मनावर विलक्षण परिणाम झाला. कॉँग्रेसच्या पुढाऱ्यांची ही वृत्ति पाहून मला कॉँग्रेसचा वीट आला. वैचारिक मतभेद असले तरी केवळ सत्तेच्या राजकारणासाठीं असें केलें जावें हें मला पटलें नाहीं. स्वातंत्र्योत्तरच्या संक्रमणावस्थेंतून आपला देश जात होता. अशा वेळीं थोडे सबुरीनें घेणें आवश्यक होतें. सर्व गोष्टींचा सांगोपांग विचार होऊन निर्णय घेण्याची ती वेळ होती. परंतु पुढारी-पणासाठीं धिसाडघाई झाली.

वैचारिक मतभेद तर सोडून द्या, परंतु या घटनांमुळें नैतिक दृष्ट्याच कॉँग्रेसबद्दल माझ्या मनांत अप्रीति उत्पन्न झाली. आम्हीं तरुण मंडळी राज-कारणांत उतरलों त्या वेळची मनःस्थिति नेमकी काय होती हें सांगणें कठिण आहे. आमच्या मनांत साहसाची, चमकण्याची, अगर पुढें येण्याची महत्त्वाकांक्षा होती. परंतु तीच एकमेव भावना नव्हती. देशसेवेची आकांक्षादेखील आम्हांला पुढें ढकलीत होती. ही नैतिक प्रेरणा हळूंहळूं वृद्धिंगत होत गेली. राजकारण ही गोष्ट केवळ पुढें येण्यासाठीं आणि लोकप्रिय होण्यासाठीं नसून आपल्या नैतिक विकासाचें साधन म्हणून त्यांचा आम्ही स्वीकार केला व त्या मार्गावर प्रगति करीत राहिलों. कॉँग्रेसमध्यें राहिल्यानें इतःपर हें उद्दिष्ट साध्य होणार नाहीं अशी माझी खात्री पटली आणि मी समाजवादी पक्षानें कॉँग्रेसमध्यें राहूं नये या मताचा जोरानें पुरस्कार करूं लागलों. वैचारिक दृष्ट्या देखील समाजवादी मंडळी याच निर्णयाला येऊन पोंचली होती. कॉँग्रेसचीं धोरणें लक्षांत घेतां समाजवादाची प्रस्थापना करण्याचें साधन म्हणून तिचा उपयोग होऊं शकणार नाहीं असेंच मत





अनुक्रमणिका

प्रभावी होत गेलें. तथापि, आमच्यापैकीं बऱ्याच मंडळींचा महात्माजींच्या कर्तृत्वावर विश्वास असल्यामुळें ते अजूनहि काँग्रेसचा कायापालट घडवून आणतील अशी त्यांना आशा वाटत होती. परंतु गांधीजींचा अमानुषपणें खून झाला आणि त्या आशा धुळीला मिळाल्या. काँग्रेसनें देखील आपली घटना बदलून समाजवादी पक्षाच्या अंतर्गत अस्तित्वास बंदी केली. काँग्रेसचें स्वरूप बदललें. ती आतां निरनिराळ्या मतांच्या लोकांची साम्राज्यविरोधी आघाडी राहिली नाहीं. तो एक पक्ष बनला. अर्थातच समाजवादी पक्षाला काँग्रेसबाहेर पडण्याखेरीज गत्यंतर उरलें नाहीं.

काँग्रेसमधून बाहेर पडणें म्हणजे एखाद्या राजप्रासादांतून अरण्यांत जाण्यासारखें होतें. परंतु माझ्यासारख्या शेंकडों लोकांची नैतिक आणि वैचारिक गरज त्यामुळें भागविली गेली आहे. काँग्रेसच्या छत्राखालीं राहून आतां आपली प्रगति होऊं शकत नाहीं अशी खात्री पटल्यावर बाहेर जाणें हेंच एक कर्तव्य होतें. एके काळीं काँग्रेसनें जसें संरक्षणछत्र होतें तसें संरक्षणछत्र देण्याची शक्ति आज समाजवादी पक्षाजवळ नाहीं. परंतु आज ना उद्यां समाजवादी पक्ष बळकट होईल, आपल्याला जो मार्ग सत्याचा वाटतो त्याप्रमाणें चालणाऱ्या लोकांची प्रगति होऊन समाजाचाहि त्यांत फायदा होईल, असा विश्वास मला वाटतो. सत्याच्या मार्गापासून समाजवादी पक्ष चळेल तर मात्र ही आशा फोल ठरेल. या मार्गांत धोका आहे हें मी मान्य करतों; परंतु देशांतील सर्व पुरोगामी आणि सत्याग्रही शक्तींना आपल्यामध्यें सामावून घेण्याचें कार्य काँग्रेसकडून होऊं न शकल्यानें तो धोका पत्करून काँग्रेसमधून बाहेर पडणें आवश्यक होतें.

आम्ही काँग्रेसमधून बाहेर पडण्यानें समाजाचें देखील हित होईल असें वर म्हटलें आहे. त्याबद्दल जरा अधिक खुलासा करणें आवश्यक आहे. काँग्रेस ही संस्था समाजवादाच्या प्रस्थापनेचें साधन होऊं शकत नाहीं असें इतर समाजवाद्यांप्रमाणें माझेंहि मत असलें तरी त्याचा अर्थ काँग्रेस आतां पूर्णतया प्रतिगामी अगर हुकूमशाही बनली आहे असें नाहीं. बाहेर राहून आम्ही आपलें ऐतिहासिक कार्य पूर्ण करूं शकलों नाहीं, तर मात्र तसें होण्याचा धोका आहे.

## विरोधी समाजवादी पक्षाची आवश्यकता

आपल्या देशाला राजकीय स्वातंत्र्य मिळालें असलें तरी साम्राज्यशाहीच्या पकडींतून त्याची पूर्ण सुटका झाली असें म्हणतां येणार नाहीं. फाळणीमुळें आपल्या स्वातंत्र्यांत फारच मोठा उणेपणा आला आहे. ब्रिटिशांची कायदेशीर पकड सुटली परंतु साम्राज्यवादी अँग्लो-अमेरिकन भांडवलशाहीचे अदृश्य पाश आपल्याभोंवतीं गुंडाळले जात आहेत. हिंदुस्थानांतील सट्टेबाज, मक्तेदार, भांडवलवाले त्या कटांत सामील होत आहेत. या पाशांत हिंदी जनता अडकणार कीं काय असा प्रश्न आहे. तसें झाल्यास फार मोठी आपत्ति येणार आहे. मग महायुद्ध टळणार नाहीं. कोरिअन जनतेची जशी लांडगेतोड होत आहे तशीच आपली होण्याची शक्यता आहे.

या दृष्टीनें पाहतां गेलीं तीन वर्षें काँग्रेस सरकारचें आर्थिक धोरण उलटया दिशेनें चालल्याचें आढळून येईल. जे सट्टेबाज भांडवलदार आपल्या ठेकेदारीच्या जोरावर कृत्रिम दुष्काळ पाडून आणि काळा बाजार करून जनतेला नागवीत आहेत त्यांनाच चुचकारण्याचा सरकारचा प्रयत्न चालूं आहे. हें धोरण कसें बदलावें हा प्रश्न आहे. आज काँग्रेसमध्यें जे लोक आहेत त्या सर्वांना हें धोरण पसंत आहे असें नाहीं. परंतु पसंत नसणारांची शक्ति अत्यल्प आहे. समाजवादी मंडळी काँग्रेसमध्येंच राहिली असती तरी, त्यांची शक्ति या कामासाठीं पुरी पडली नसती. कारण, पक्षाचें विसर्जन करूनच त्यांना काँग्रेसमध्यें राहतां आलें असतें. काँग्रेसच्या बाहेर पडून श्रमजीवी जनतेची संघटना करण्याचा प्रयत्न करणें याशिवाय त्यांच्यापाशीं दुसरा मार्गच नव्हता.

लोकशाहीच्या दृष्टीनें त्यांनीं केलें तें योग्यच केलें असें मला वाटतें. काँग्रेसचीं धोरणें चुकत असतील तर, जनमत आपल्या बाजूला करून घेऊन आपल्याला हवें तसें धोरण आंखलें पाहिजे. काँग्रेसच्या आजच्या धोरणानुसार जनतेचे प्रश्न सोडविण्यास ती असमर्थ आहे हें उघड दिसत आहे. जनतेला



अनुक्रमणिका







# काँग्रेसबद्दलच्या माझ्या वैचारिक प्रतिक्रिया

तें पटवून द्यावयाचें आहे. समाजवादी पक्ष आपल्या लोकशाही समाजवादाच्या धोरणाशीं एकनिष्ठ राहून कार्य करील, तर एक ऐतिहासिक गरज भागविण्याचें श्रेय त्याला मिळवितां येईल.

आपण ज्या लोकशाही पद्धतीचा अंगीकार केला आहे ती यशस्वी व्हावयाची असेल तर, देशांत किमान दोन संघटित राजकीय पक्षांची आवश्यकता आहे. शासनसंस्था ही दंडावर आधारलेली असते. म्हणजेच वेळप्रसंगीं हिंसेचा अवलंब करण्याची तिला कायदेशीर मुभा असते. ज्या प्रमाणांत लोकमत जागृत आणि संघटित असेल त्या प्रमाणांत हिंसेचा हा अंश कमी होत जाईल. देशांत विरोधी पक्ष नसेल तर अधिकारारूढ पक्षाची वृत्ति उत्तरोत्तर हुकूमशाही होत जाण्याचा फार संभव असतो. आजच्या परिस्थितींत काँग्रेस ज्या ध्येयांचा पुरस्कार करूं इच्छिते तीं सिद्ध व्हावयाचीं असल्यास लोकशाहीच्या तत्त्वावर आधारलेल्या एका विरोधी पक्षाची अत्यंत आवश्यकता आहे. या दृष्टीनेंच काँग्रेसनें विरोधी समाजवादी पक्षाचें महत्त्व लक्षांत घ्यावें असें मला वाटतें. तसें न होईल तर, देशांतील लोकशाहीविरोधी शक्ती बळावत जातील आणि लोकशाही आणि शुद्ध साधनें यांवर विश्वास ठेवणाऱ्या लोकांना दीर्घकाळपर्यंत नामशेष व्हावें लागेल.

समाजवादी पक्षाला देशांत लोकशाहीनिष्ठ समाजवादी समाजरचना निर्माण करावयाची आहे. तसें होईल तरच जनतेचे प्रश्न सुटतील. जनतेचें दास्य द्विविध आहे: आर्थिक दास्य आणि सामाजिक दास्य. केवळ राज्यसत्ता हातीं घेऊन हे प्रश्न सुटणार नाहींत. राज्यसत्ता हातीं आली तर आजचीं धोरणें बदलतां येतील; परंतु तेवढयानें लोकशाही समाजवादाची प्रस्थापना होणार नाहीं. त्यासाठीं जनतेमध्यें त्या ध्येयाबद्दल आकर्षण निर्माण झालें पाहिजे. त्याच्या निर्मितीसाठीं जाणीवपूर्वक परिश्रम करण्यास बहुसंख्य जनता आपखुषीनें सिद्ध होईल असें आपणांस करावयाचें आहे. म्हणून समाजवाद्यांनीं राजकारणाबरोबरच नवसमाजनिर्मितीच्या विधायक अंगावर भर दिला पाहिजे.

हा मार्ग बराच दूरचा आहे; कष्टाचा तर निश्चितच आहे. परंतु ज्या ध्येयाची उपासना समाजवाद्यांनीं करावयाची, त्यासाठीं तें अपरिहार्यच आहे. यावर असा एक प्रश्न विचारतां येण्यासारखा आहे कीं, हें सर्व होईपर्यंत जागतिक परिस्थिति तुम्हांला स्वस्थ बसूं देईल काय? हा प्रश्न अगदीं सयुक्तिक आहे आणि त्या दृष्टीनेंच हिंदुस्थानच्या परराष्ट्रीय धोरणाचें मूल्यमापन केलें पाहिजे.

## सामाजिक क्रान्तीवर जागतिक शांतता अवलंबून

पंडित जवाहरलाल नेहरूंनी अमेरिका आणि रशिया यांपैकीं कोणत्याच गटांत सामील व्हावयाचें नाहीं असें तटस्थतेचें धोरण आंखलें आहे. जागतिक वर्चस्वासाठीं आज दोन गटांत स्पर्धा चालू आहे आणि त्यामुळें तिसऱ्या महायुद्धाची भीति निर्माण झाली आहे. महायुद्ध टळावें आणि यांपैकीं कोणाचेंच वर्चस्व प्रस्थापित होऊं नये यासाठीं आशियांतील राष्ट्रांनीं आपलें तटस्थतेचें स्वतंत्र धोरण ठेवावें हेंच योग्य आहे. परंतु हें धोरण यशस्वी व्हावयाचें असेल तर, नुसतें स्वस्थ बसून भागणार नाहीं. स्वस्थ बसावयाचें म्हटलें तरी तें शक्यच नसतें. स्वस्थ बसणारे आपोआप या ना त्या गटांत गोंवले जातातच. उत्तर कोरिआनें दक्षिण कोरियावर केलेल्या आक्रमणाचा विरोध करणाऱ्यांना आपण नैतिक पाठिंबा द्यावयास हरकत नाहीं; परंतु त्यांतील अमेरिकेचा डावहि आपण ओळखला पाहिजे. 'कम्युनिस्ट चीनला सेक्यूरिटी कौन्सिलमध्यें घ्या' हा आग्रह बरोबर आहे; पण तेवढयानें काम भागणार नाहीं. हिंदुस्थान आणि अन्य आशियाई राष्ट्रांत विद्यमान असलेली जुनाट समाजव्यवस्था बदलून काळाच्या हांकेला आपण ओ देणार कीं नाहीं असा प्रश्न आहे. दुसऱ्या महायुद्धाच्या वेळीं आपण म्हणालों कीं, हिंदुस्थान स्वतंत्र होईल तरच दोस्तांचे युद्धहेतू सिद्ध होतील. आजहि तीच परिस्थिति निराळ्या स्वरूपांत उभी आहे. हिंदुस्थानांत समाजक्रान्ति होईल तरच जागतिक शांतता प्रस्थापित होऊं शकेल. कारण मग हिंदुस्थानाला आशियांतील राष्ट्रांचा एक प्रभावी गट निर्माण करतां येईल. जरा निराळ्या शब्दांत सांगावयाचें तर, पंडित जवाहरलाल नेहरूंची तटस्थता खऱ्या अर्थानें क्रियाशील व्हावयास पाहिजे; आणि त्याची सुरुवात अंतर्गत धोरणापासूनच होणें








अनुक्रमणिका

आवश्यक आहे. हिंदी भांडवलदार आपली मक्तेदारी टिकविण्यासाठीं अँग्लो-अमेरिकन साम्राज्यवाद्यांच्या कच्छपीं लागले आहेत. देशाचा सत्यानाश करूं पाहणाऱ्या या भांडवलदारांना चुचकारण्याचें धोरण टाकून पंडितजींनीं जनतेचा खराखुरा पाठिंबा मिळविला पाहिजे. आपल्या व्याख्यानाला लक्षावधि लोक येतात येवढ्यावरून आपल्याला जनतेचा पाठिंबा आहे असें त्यांनीं मानूं नये. जनतेचा क्रियाशील पाठिंबा मिळविल्याशिवाय तटस्थतेचें हें धोरण यशस्वी होणार नाहीं. अन्न, वस्त्र आणि घर या जनतेच्या तांतडीच्या गरजा आहेत. त्या भागविण्यासाठीं भांडवलदारी व्यवस्थेवर विसंबून राहिल्यास ते प्रश्न सुटण्याऐवजीं अधिकच बिकट होण्याची शक्यता आहे. त्यासाठीं मूलभूत धंद्यांचें राष्ट्रीयीकरण करून योजनाबद्ध अर्थव्यवस्थेचा पाया घातला पाहिजे. आर्थिक धोरणांत असा मूलभूत बदल केल्यास भांडवलदारवर्गाचा पाठिंबा आपल्याला मिळणार नाहीं आणि देशांत बेबंदशाही माजेल असा युक्तिवाद केला जाणें शक्य आहे. परंतु तो बरोबर नाहीं. १९४२ सालीं देखील बेबंदशाहीचें बुजगावणें आपल्यापुढें करण्यांत आलें होतें. परंतु आपण त्याची पर्वा केली नाहीं. आजची परिस्थिति तर त्याहून पुष्कळच अनुकूल आहे. कारण राज्याचीं सूत्रें पंडितजींच्या हातीं आहेत. राज्यसत्तेचा उपयोग करून बेबंदशाही माजवूं पहाणाऱ्या प्रतिगामी शक्तींचा बींमोड करणें सहज शक्य आहे. अशा क्रान्तिकारक धोरणाचा सूत्रपात जर आमचे पंतप्रधान करतील तर त्यांना समाजवादी पक्षाचें सहकार्य मागण्याचा हक्क प्राप्त होईल आणि जनतेचा उत्स्फूर्त पाठिंबा मिळूं शकेल. लोकशाहीचें आणि जागतिक शांततेचें आपलें ध्येय पूर्ण व्हावें असें वाटत असेल तर पंडितजींनीं आत्मविश्वासपूर्वक आणि धडाडीनें पुढें येऊन जनतेला हा नवा मार्ग दाखविला पाहिजे.

काँग्रेसकडून आजच्या घटकेला या अपेक्षा करणें वेडेपणाचें ठरेल. परंतु परिस्थितीची निकड लक्षांत घेतली जावो आणि नाशिकच्या अधिवेशनांत असें कांहीं तरी घडो अशी इच्छा आहे.

काँग्रेसनें केलें नाहीं तरी जनतेनें हात जोडून स्वस्थ बसावयाचें नाहीं. त्या दृष्टीनेंच समाजवादी पक्षाचें फार महत्त्व आहे. काँग्रेसचा विरोधी पक्ष म्हणून त्याला अत्यंत मोठी कामगिरी बजवावयाची आहे. आपल्या लढाऊ व विधायक कार्यक्रमाच्या द्वारां जनतेचा पाठिंबा त्यानें मिळविला पाहिजे. जें ध्येय त्यानें आपल्या डोळ्यापुढें ठेवलें आहे त्यासाठीं सतत परिश्रम करावयास हवेत. दुसऱ्यांनीं काय करावयास हवें याची मीमांसा करीत बसून भागणार नाहीं. आपण आपलें कर्तव्य बजावलें तर दुसरेहि त्यांचीं कर्तव्यें पार पाडतील, अशा निष्ठेनें कार्य केलें पाहिजे. समाजवादाच्या दृष्टीनें काल अनुकूल आहे. इतःपर भांडवलशाही समाजरचना टिकून राहूं शकत नाहीं. आपल्या तत्त्वांशीं एकनिष्ठ राहून आपल्या ध्येयमार्गावर खंबीरपणें पावलें टाकीत पुढें गेल्यास समाजवादी पक्षाला त्याचें अवतारकार्य निश्चितपणें पूर्ण करतां येईल अशी माझी धारणा आहे.

---

## डांस मारायचा सुकुमार उपाय :

न्यूयॉर्कमधील जंतुशास्त्र-खात्याचे प्रमुख डॉ. मार्टन सी. सी. काह्न (Kahn) यांनीं डांसांचा उपद्रव नाहींसा करण्याचा एक नवीन उपाय शोधून काढला आहे. क्यूबामध्यें ते प्रयोग करीत असतां त्यांना असें आढळून आलें कीं डांसांमधील मादी डांसाचा आवाज मोठा करून तो जर ध्वनिक्षेपित केला तर पाव मैलाच्या परिवांतील नर-डांस त्यावर आकृष्ट होऊन धांवत येतात. या अनुभवावरून डॉ. काह्न यांनीं असें करावयाचें योजिलें आहे कीं मादी डांसांच्या आवाजासारखा मोहक आवाज नभोवाणीवरून निरनिराळ्या केंद्रांतून ध्वनिक्षेपित करावा म्हणजे या प्रेमाच्या हांकेला 'ओ' द्यायला नर डांस ध्वनिक्षेपक यंत्रावर येऊन पडतील व विजेच्या तारांचा स्पर्श होऊन मरतील.

—'संडे न्यूज' (९-७-५०) वरून











अनुक्रमणिका

# अभंग-पंचक

(१)

न कळे मजसी कैसें म्यां जगावें
कैसें वावरावें । संसारांत
सूक्ष्म भावनांचा चालला झगडा,
मनांत केवढा । कल्लोळ हो
महान् वासना, महान् कर्तव्य ।
यांमध्यें असह्य । हो संग्राम
केंवी जाणावें म्यां तेथ युक्तायुक्त ?
विरोध हो व्यक्त । दृष्टीपुढें
भोग-त्याग यांची चाले तीव्र तेढ
अंतर्यामीं गूढ । अनिर्वाच्य
म्हणून नेणतों कैसी तुज सोडूं ।
हृदयीं पकडूं । कैसी ? नेणें !

(२)

तुझा सहवास घडे अकस्मात
चित्तास अद्‌भुत । होई सुख
कारणभावाचा कळला न धागा
न कळे या योगा । काय हेतु ?
—आणि एकाएकीं होई तो विनष्ट
अकल्पित गोष्ट । केंवी घडे ?
संयोग-वियोग होती योगायोगें
विवर्त आवेगें । होती स्फुट
जनन-मरण हेंही अभावित
पंचप्राण-ज्योत । तेवे-विझे !
अवश्यंभावी हें होतें घडायाचें ।
तेथें मज कैचें । गूढ कळे ?

(३)

विश्वांत चालला भयाण संहार
कोण तगणार । याच्यांतून ?
नरानेंच केला हीन किती नर
बुद्धीचा व्यापार । एकमार्गी
" योग्यांचा टिकाव "—नियम सृष्टीचा
उलटून त्याचा । हो विकार
" बलिष्ठ "च " योग्य " जाहला जगाया
जीवन कांसया । दुर्बळांना ?
तोच भासतसे मनींही नियम
सर्वोच्च सक्षम । भाव कोण ?
' रौद्र ' भाव विश्वीं, ' करुण ' मन्मनीं
तुझीया जीवनीं । मात्र ' शांत ' !

(४)

जीवनांत होई यापरी विध्वंस
मिळे स्वैरतेस । मुक्त द्वार
पावित्र्य, मांगल्य, सौन्दर्य, सद्‌भाव
यांच्यावरी घाव । तर्क घाली
आणि ऐकान्तिक घोषिती सिद्धान्त
वदतोव्याघात । शास्त्रोशास्त्रीं
तर्काच्या वरानें बुद्धि बने स्वैर
माते भस्मासुर । स्वयंनाशा !
तयाच्या साधनें तयाचाच अंत
जगतीं निवान्त । कोण असे ?
तुझीया सद्‌भावीं, तुझीया मांगल्यीं
तुझीया कैवल्यीं । अनंतत्व !

(५)

मन तडफडे टाळण्या आसक्ति
ऐसी का विरक्ति । साध्य होई ?
' विराग ' नोहेची ' रागा 'चा अभाव
व्यक्तिगर्भ भाव । आवश्यक
अंतरींचा ' राग ' बनतां विशाल
क्षितिजाचा गोल । इंदावतो
' पर ' न परका, स्वतःचेंच रूप
मनीं ये साक्षेप । अनुभवा
आणि हें ' रागा 'चें स्वरूप ' विशेष '
'विराग' नांवास । सार्थ करी !
माझा अनुभव तितुका न भव्य
तुझ्यांत वास्तव्य । होई माझें !

— ना. ग. जोशी

श्री. दि. के. बेडेकर

# भारतीय जनराज्यासाठीं

काँग्रेस ही भारतीय जनतेची आद्य राजकीय संस्था असूनहि तिच्याबद्दल जनतेची भावना आजच्या घटकेला काय आहे?

या प्रश्नाचें उत्तर जाहीरपणें व औपचारिकपणें काँग्रेसवादी काय देतात त्याबद्दल विचार करण्याची विशेष गरज नाहीं. मनांतून स्वतःशीं त्यांना काय वाटतें तेवढेंच आपण जमेस घेण्यासारखें आहे. आणि तें काय वाटतें हें समजणें सोपें आहे. अनेक लहान-मोठ्या कार्यकर्त्यांशीं चर्चा करीत असतांना मला असें आढळून आलें आहे कीं, काँग्रेसबद्दल पूर्वीची आदराची व आपुलकीची भावना आज लोकांच्या मनांत उरलेली नाहीं, याची खोलवर जाणीव सर्वांना आहे. याचा अर्थ असा नाहीं कीं, लोक आज बंड करावयास उत्सुक आहेत. उलट, त्यांना अजूनहि काँग्रेसच्या कांहीं पुढाऱ्यांबद्दल व्यक्तिगत आदर व अपेक्षाहि आहेत. पण काँग्रेस या संघटनेबद्दल मात्र लोकांचा भ्रमनिरास झाल्यासारखा आहे. लोकांचीं मनें दिशाहीन व खिन्न झालीं आहेत हें खास. सुरवंटाचें फुलपांखरूं व्हावें तसें कांहीं तरी, पण उलट दिशेनें, काँग्रेसचें झालें आहे एवढें लोकांना वाटत असून सुदैवानें लोकांचें हें मन काँग्रेसवाल्यांपैकीं बहुतेकांना कळत आहे.

लोकसेवा, भारतीय राष्ट्रवाद, ब्रिटिश साम्राज्य-सत्तेशीं संघर्ष, आणि साम्राज्यसत्तेशीं विरोधी असलेल्या आयरिश राष्ट्रवादाशीं, सोव्हिएत क्रांतीशीं, चिनी क्रांतिकारक लढ्याशीं व इतरहि सर्व साम्राज्यविरोधी शक्तींशीं एकजूट हें काँग्रेसचें परं-परागत ब्रीद होतें. अहिंसेच्या सिद्धान्तामुळेंहि या ब्रीदाला बट्टा लागण्यासारखी परिस्थिति कधीं निर्माण होऊं शकली नाहीं. गांधी युगीन काँग्रेस देखील मूलतः राष्ट्रवादी आणि लोकजीवनाशीं एकरूपच राहिली. रूपांतराचा क्षण आला तो अचानक आलेल्या सत्तांतरामुळें आला. सत्तांतर होतांच मात्र काँग्रेसचीं जुनीं ब्रीदें, लोकजीवनाशीं नातें आणि सर्वच अंतरंग बहिरंग बदललें.

सत्तांतरामुळें झालेला हा कायापालट म्हणजे गांधी युगीन काँग्रेसचा सत्ता युगीन काँग्रेसमध्यें झालेला सपशेल नवा अवतार आहे.

या रूपांतरामुळें नव्या भारतापुढील प्रश्न सोडवि-ण्यासाठीं जनतेच्या हातीं या परंपरागत संघटनेची शक्ति व मनोधैर्याची भूमिका उरली नसल्यासारखी झाली आहे व त्यामुळें काळाबाजारवाले, नोकरशहा व इतर जनशत्रू मोकाट व बेलगाम होत चालले आहेत. हें दृश्य पाहून काँग्रेसच्या या रूपांतरानें जहालपक्षीयांनाहि वस्तुतः खेदच व्हावयास पाहिजे व तो होत आहे. आज कोणताहि एक जहाल पक्ष किंवा सारे जहाल पक्ष मिळून संयुक्तपणें काँग्रेसची पूर्वीची भूमिका घेऊन ती प्रत्यक्षांत पार पाडूं शक-लेले नाहींत; त्यामुळें तर काँग्रेसच्या रूपांतरानें झालेली लोकशाहीची हानि जास्तच तीव्रपणें सर्वांना जाणवा-यला हवी. आज जी गरज आहे ती केवळ पक्षनिष्ठ राजकारणाचें घोडें दामटण्याची नाहीं. उलट, लोकशाहीची भूमिका घेऊन लढण्याची तयारी ज्यांच्या ज्यांच्या मनांत आहे त्या प्रत्येक भारतीयानें आपलें बळ इतरांशीं एकवटून नवे प्रश्न सोडविण्यां-साठीं चिकाटीचा व प्रखर लढा करण्याचा हा क्षण आहे. या लढ्यामध्यें जहाल पक्षीयांच्याबरोबरच सत्तायुगीन काँग्रेसमध्यें असूनहि सामील होणें हें,





अनुक्रमणिका

ज्यांना लोकांच्या हितासाठीं धडपडावयाचें आहे, त्यांचेंहि कर्तव्य आहे.

## सत्तांतराचें स्वरूप व परिणाम

ज्या सत्तांतरामुळें कॉंग्रेसचें रूपांतर घडलें त्या सत्तांतरांतच आजच्या भारतीय परिस्थितीचें मर्म आहे व साऱ्या वाढत्या अरिष्टांचें मूळ आहे. या सत्तांतराचें खरें स्वरूप म्हणूनच नीट ओळखावयास हवें.

ब्रिटिशांनीं आपलें चंबूगवाळें येथून उचललें व भारतांत राजकीय सत्तांतर झालें एवढ्यापुरतें सर्वांचेंच एकमत होऊं शकतें. पण प्रश्न इतका ढोबळ व सोपा नाहीं. राजकीय सत्ता ब्रिटिशांनीं सोडली खरी, पण तें दान कोणाच्या हातीं त्यांनीं सोंपविलें, हा मुख्य प्रश्न आहे. याचेंहि ढोबळ उत्तर असें देतां येईल कीं, कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांच्या हातीं ब्रिटिशांनीं सत्ता सोंपविली. पण या वर्णनानें आजच्या वास्तविक स्थितीचें संपूर्ण चित्र दिसूं शकत नाहीं. फक्त त्या चित्राचे रंग दिसतात पण मूलभूत आराखडा दिसत नाहीं. कारण तो त्या रंगाच्या खालीं 'अदृश्य' झाला आहे.

हा 'अदृश्य' आराखडा म्हणजेच आजच्या राजकीय सत्तेच्या इमारतीखालीं पायासारखी असलेली भारताच्या अर्थव्यवस्थेची चौकट आहे. ही चौकट काल-आजच अचानक उद्भवलेली व तरंगती नाहीं; उलट, चांगली पोलादी आहे. ब्रिटिश राजवटीनें प्राचीन व मध्ययुगीन अर्थव्यवस्थेचा विध्वंस करून जी नवी शोषक अर्थव्यवस्था भारतावर लादली त्या अर्थव्यवस्थेला एक-दीड शतकाचें स्थैर्य लाभलें. त्यामुळेंच भारतव्यापी सामर्थ्य व चिवटपणा तिला आला होता. जुने राजे, जहागिरदार व वतनदार गेले आणि त्यांच्या जागीं जमीनदार, व्यापारी, कारखानदार आणि बँकवाले कोट्यधीश आले. तसेंच सुशिक्षित वर्ग आणि कामगार आले. या नव्या वर्गांपैकीं सधन वर्ग हे ब्रिटिशांच्या पोलादी अर्थव्यवस्थेचे, राज्यकारभाराचे व सैन्यासारख्या दंडव्यवस्थेचे पोलादी आधार बनले.

ढोबळ मानानें ब्रिटिशांना साधनरूप ठरलेल्या सधन वर्गांच्या हातींच आज सत्तांतर झालें आहे. पण त्यांतल्या त्यांत ब्रिटिशांनीं मागें ठेवलेल्या अर्थव्यवस्थेची उतरंडच आज अशी रचली गेली आहे कीं बँकवाल्या कोट्यधीशांच्या हातींच सर्व अर्थांच्या (व अनर्थांच्या) नाड्या आज आहेत. सत्ता खरी पाणी भरत आहे ती या कोट्यधीशांच्या घरींच.

भारताचें परराष्ट्रीय धोरण संदिग्ध व डळमळीत आहे, कारण भारताच्या अर्थव्यवस्थेलाच अजून डळमळीतपणा व परावलंबीपणा आहे असें ता. ४ डिसेंबर १९४७ रोजीं पार्लमेंटपुढील भाषणांत पंडित नेहरूंनीं सांगितलें होतें. तीच गोष्ट अंतर्गत राजकारणाच्या बाबतींत सुद्धां खरी आहे. सारेंच राजकारण हें नेहमीं अर्थव्यवस्थेच्या नाड्या हातीं असणाऱ्यांच्या तंत्रानें चालतें, नव्हे राजकारणाला तसें चालावेंच लागतें. ह्यांत पंडित नेहरूंचा दोष नाहीं. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची महती कितीहि मोठी मानली तरी वरील सत्य डावलून चालणार नाहीं. खुद्द त्यांनींच तें सत्य वर उल्लेखिल्याप्रमाणें मानलें आहे.

राजकारण हें स्वयंभू नसतें हें सत्य ओळखलें कीं सत्तांतराचा अर्थहि स्पष्ट होतो व सिंहासनाखालील बँकवाल्यांचीं भुयारें नजरेस दिसूं लागतात. काळा बाजार स्वतंत्र भारतांत कां माजावा याचें आश्चर्य मग वाटेनासें होतें. याचा अर्थ असा कीं, आज सत्तांतरानंतरचें राज्य हे बँकवाले राबवीत आहेत. हें कटु सत्य स्वीकारूनच सर्वांनीं पुढील पावलें टाकावयास पाहिजेत.

## बँकवाल्यांचे शत्रु-मित्र

म्हणूनच आतांचे भारतीय प्रश्न बँकवाल्या भांडवलदारांशीं लढण्याच्या मुख्य प्रश्नांत सामावलेले आहेत. आजचा भाववाढीचा दैनंदिन जीवनाचा प्रश्न घ्या. वाढत्या बेकारीचा आणि शिक्षकांपासून कामगारांपर्यंत सर्व नोकरांवरच्या वाढत्या कामाचा व अपुऱ्या वेतनाचा प्रश्न घ्या. मुंबईला महाराष्ट्रापासून तोडण्याची किंवा हैदराबादची भाषावार विभागणी टाळण्याची सत्ताधाऱ्यांची धडपड लक्षांत घ्या. किंवा दूरवर जाऊन, परराष्ट्रीय घडामोडींत ब्रिटिश व अमेरिकन धोरणाच्या जवळ राहण्याचे प्रयत्न घ्या. या सर्व घटनांत एकच गोष्ट दिसते. बँकवाल्यांचे हितसंबंध व डावपेंच नेमके असे आहेत कीं, जे लोकहिताला बाधक आहेत.

बँकवाल्यांना प्रथमतः ब्रिटिश बँकवाल्यांशीं जुने 'ऋणानुबंध' कायम राखावयाचे आहेत व तसें करीत, शक्य होतील तेवढे, अमेरिकन सावकारांशींहि नवे 'ऋणानुबंध' जोडावयाचे आहेत. मुंबई, कलकत्ता वगैरे महानगरींच्या जोरावर ब्रिटिशांनीं आपलें शोषणाचें भीषण कार्य शतकभर चालविलें. तुंबडी लावण्याची ही जागा तशीच, त्याच कामासाठीं, अलग राखण्यांत यावी अशी त्यांच्या या वारसदारांची इच्छा आहे. हैदराबादचें राज्य हें दक्षिण–भारतीय लोकजीवनाच्या छातीवर ठेवलेलें एक अवजड वजन म्हणून ब्रिटिशांनीं वापरलें आणि महाराष्ट्र, आंध्र व कर्नाटक या तीन प्रदेशांचे तीन तुकडे निजामी टाचेखालीं दडपून ठेवले. आज त्या निझामची सरबराई ठेवून ही फाळणी व हें वजन कायम ठेवण्यासाठीं बँकवाल्यांनीं कंबर कसली आहे. या साऱ्या गोष्टी सरकारी धोरण म्हणून काँग्रेसच्या माथीं पडत आहेत.

माझी ही मीमांसा काँग्रेसवाद्यांपैकीं अनेकांना आवडणार नाहीं. पण वस्तुस्थितीचा दुसरा अर्थच लावणें शक्य नाहीं. व्यक्तिनिरपेक्ष व निःस्पृह दृष्टीनें पाहिलें तर त्यांनाहि हें दिसूं शकेल कीं, बँकवालेच आज आपल्या हिताची जपणूक सरकारी धोरणाच्या मागें उभें राहून करीत आहेत.

या बँकवाल्यांचे मित्र भारतीय समाजांत जवळ जवळ नाहींतच. कारण साऱ्यांनाच भरडून दावणीला बांधण्याची त्यांची योजना आहे. बँकवाले हे जगभर एकाच तंत्रानें चालतात व तें तंत्र म्हणजे सावकारी तंत्र आहे. लहान भांडवलाच्या कारखानदारालाहि शेवटीं यांच्या सावकारी पाशांत गुरफटावें लागतें, नाहीं तर यांच्याशीं दुबळी स्पर्धा करीत बाजारांतून नामशेषच व्हावें लागतें. महाराष्ट्रीय भांडवलवाले आज या सावकारी पाशाविरुद्ध हातपाय झाडीत आहेतच ना? पण मुंबईच्या मोक्याच्या ठिकाणाहून महाराष्ट्राची नाकेबंदी करणें बँकवाल्यांना काय आवघड आहे?

जेथें छोट्या भांडवलदारांची बँकवाल्यापुढें अशी गत आहे, तेथें हातमागवाल्या किंवा पॉवरलूमवाल्या कारखानेवाल्यांची, साध्या विणकरांची किंवा बटाटे आणि ऊंस पिकवून श्रीमंत बनलेल्या शेतकरी-बागाइतदारांची काय डाळ शिजणार? हे सारे वर्गहि बँकवाल्यांचे मिंधे बनत आहेत व रगडले जात आहेत. ते या बड्या सावकारांचे मिंधे आहेत. पण रगडले जाण्यामुळेंच ते मित्र मात्र नाहींत!

पण आजच्या भारतीय समाजाच्या पोटांत वाढणारा खरा मोठा संघर्ष म्हणजे या सधन वर्गांची बँकवाल्यांशीं होणारी 'गनिमी काव्या'ची ही लढत नव्हे. मोठा प्रखर संघर्ष आहे तो बँकवाले व निर्धन वर्ग म्हणजे बहुसंख्य समाज यांच्यांतील आहे. हा निर्धन समाज सुशिक्षित–अशिक्षित, शहरी–खेडवळ, संघटित–विस्कळित असा सरमिसळ आहे, पण त्या साऱ्यांचा वाढता असंतोष व संघर्ष मात्र एकजिनसी व भक्कम आहे. या बहुजनसमाजाला बँकवाल्यांचें समाजाच्या अर्थव्यवस्थेवरील वर्चस्व नाडीत आहे व अन्नाला महाग करीत आहे. साहजिकच, साऱ्या निर्धन समाजाची एकसंध असंतोषाची अघाडी बँकवाल्यांविरुद्ध तयार होत आहे.

### संयुक्त आघाडीचें उद्दिष्ट

राजकारणाच्या भाषेंत असंतोषाच्या या अघाडीलाच राजकीय पक्षांची संयुक्त अघाडी असें रूप येणें अटळ असतें. अशा अघाडींत सर्वच माणसें आदर्श ध्येयवादानें प्रेरित होऊन राजकारण करतात असें नाहीं व अशा अघाडीचें राजकारण हेवेदावे, संधिसाधूपणा व कुटिल राजनीति यांनीं डागळत नाहीं असेंहि नाहीं. ब्रिटिश सत्तेविरुद्ध भारतानें जी संयुक्त अघाडी लढविली तिच्यांतहि हे दोष होतेच. आघाडीमधील पक्षांच्या किंवा व्यक्तींच्या अशा दोषांमुळें होणाऱ्या घातापासून जनतेच्या राजकारणाला वांचविण्याची धडपड मात्र प्रत्येकानें केली पाहिजे व राजकारणाचें पावित्र्य टिकविण्यासाठीं आटोकाट प्रयत्न केले पाहिजेत. शिवाय मुख्य उद्दिष्टहि एकसारखें नजरेसमोर ठेवलें पाहिजे. तें उद्दिष्ट म्हणजे भारताच्या संपूर्ण स्वातंत्र्यासाठीं व खऱ्याखुऱ्या लोकसत्ताक राजवटीसाठीं लढा हेंच असूं शकतें. ही राजवट जनतेच्या जागृत सामर्थ्यावर उभारलेली असावी लागेल व तिची स्थापना होण्यासाठीं सत्तांतरानें निर्माण झालेली आजची बँकवाल्यांच्या तंत्रानें चाललेली राजवट बदलावी लागेल.

# भारतीय जनराज्यासाठीं

ही नवी राजवट आणण्यासाठीं मुख्यतः शहरी कामगारवर्ग आणि सर्वच निर्धन वर्ग लढतील, परंतु बँकवाल्यांविरुद्ध असणारे सधनवर्गहि या लढ्यांत सर्व समाजाबरोबर राहतील; नव्या राजवटीशींहि समाजहिताची जाणीव ठेवून तो इमानदार राहणें शक्य आहे अशी आज भारताची एकंदर समाजस्थिति आहे. थोड्याफार फरकानें अशी स्थिति चीनमध्यें होती व तेथील नव्या राजवटीशीं तेथील राष्ट्रीय भांडवलदार अजूनपर्यंत मित्रत्वानें वागत आहेत.

याचा एक अर्थ स्पष्ट करावयास हवा कीं, भारतीय समाजाला जें स्थित्यंतर व जी नवी राजवट आज हवी आहे ती सोव्हिएत क्रांतीनें रशियांत आलेली पूर्णपणें कामगारवर्गीय समाजवादी स्थिति व राजवट नव्हे. भांडवलदारांच्या हातीं सत्ता तर नसावी अशी पण समाजवादी कामगारवर्गीय सत्ताहि नसावी अशी म्हणजे चीनमध्यें आज स्थापन झालेल्या जनतेच्या लोकसत्ताक राजवटीसारखी राजवट येथें असावी, ही अपेक्षा आज भारतीय लोकांच्या मनांत आहे व तीच येथील आर्थिक, राजकीय व सामाजिक वस्तुस्थितीला धरून आहे.

अशी खरीखुरी लोकसत्ताक राजवट ( 'पीपल्स रिपब्लिक ' ) स्थापन करण्याच्या कार्यांत चिनी कम्युनिस्टांनीं अविरत श्रम केले व लोकांच्या आकांक्षांशीं व देशाच्या खऱ्या परिस्थितीशीं व परंपरेशी अखंड जिव्हाळ्याचें नातें राखलें. म्हणूनच या नव्या राजवटीचें नेतृत्व कम्युनिस्टांच्या हातीं सोंपवितांना तेथील निर्धन व सधन वर्गांना, व नाना धर्मांच्या व राष्ट्रकांच्या लोकांना, यत्किंचित् धोका वाटला नाहीं. जनतेचें वैयक्तिक, धार्मिक व राष्ट्रीय परंपरेचें स्वातंत्र्य चीनमध्यें अबाधित राखण्याची प्रतिज्ञा करणारे चिनी कम्युनिस्ट आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें वागतील असा विश्वास नतेमध्यें उत्पन्न व्हावा, एवढें प्रचंड कार्य तेथील म्युनिस्टांनीं गेल्या वीसपंचवीस वर्षांत पार पाडलें हे.

## पुढील कार्य

आज भारतांतहि तेवढें व त्यापेक्षांहि मोठें व अवघड कार्य येथील लोकपक्षांच्या लहान-मोठ्या कार्यकर्त्यांना पार पाडावयाचें आहे. या कार्याचें उद्दिष्ट मागें सांगितल्याप्रमाणें नवी खरीखुरी लोकसत्ताक राजवट हेंच आहे. या उद्देशाच्या पूर्तीसाठीं मार्ग कोणते याचें स्पष्ट उत्तर सर्वांनीं दिल्याशिवाय संयुक्त आघाडीला एकसंधपणा येणें अवघड, किंबहुना अशक्यच होणार आहे.

मार्गांच्या बाबतींत दहशतवादाचा प्रथमच स्पष्ट निषेध करणें जरूर आहे व तसा निषेध कम्युनिस्टांसकट सर्वांनीं आतां केला आहे. " सन १९४२ मध्यें कॉंग्रेसवाद्यांनीं हेंच केलें ना ? " असा प्रश्न विचारून त्यांना गप्प करण्याचा वकिली चतुरपणा या बाबतींत कम्युनिस्टांनीं दाखवूं नये असा मात्र इषारा देणें जरूर वाटतें. ऑगस्ट आंदोलनांतील पहिला स्वयंस्फूर्त प्रतिकार सोडला तर, नंतरच्या दहशतवादी गुप्त आंदोलनाचें पर्यवसान शाळांना आगी लावणें, गिरण्यांतून बॉम्बस् उडविणें, दरोडे घालणें—असल्या प्रकारांत झालें. यावरून दहशतवादाला देशभक्तीची जोड असूनहि त्याचा अधःपात होतो, हेंच सत्य कॉंग्रेसवादीहि मानतील व तेंच कम्युनिस्टांनींहि मानलें पाहिजे. आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळींत गेलीं शंभर वर्षें कम्युनिस्टांनीं दहशतवादाविरुद्ध सतत लढा केला आहे ही गोष्ट येथेंहि विसरली जाऊं नये.

पण दहशतवाद आणि सशस्त्र लोकक्रांति ह्या वेगळ्या गोष्टी आहेत. आजचे सत्ताधारी मात्र सर्वच सत्ताधाऱ्यांप्रमाणें बोलत आहेत व कायदे न पाळणें म्हणजे दहशतवाद असा कांगावा करीत आहेत. सर्वसाधारणपणें, कायदे पाळले तरच समाजाची घडी टिकेल हें सत्य आहे. वागणुकीचे व नागरजीवनाचे कांहीं कायदे मोडणें आणीबाणीच्या वेळींहि अयोग्य होईल. पण हें सत्य स्वयंभू नाहीं. समाजाचें शासन लोकहितानुसारी आहे व कायदे हे मूठभर लोकांच्या फायद्यासाठींच नाहींत असें धरूनच वरील सत्य आपण मानतों. पण काळ्या बाजारवाल्यांनीं कृत्रिम दुष्काळ केला तर, जनतेनें कायदे पाळावे कीं स्वसंरक्षणासाठीं कायदे मोडावे ? निझामच्या रझाकारांनीं जेव्हां तेलंगणांत शेतकऱ्यांच्या वित्तावर व स्त्रियांच्या अब्रूवर धाड घातली तेव्हां शेतकऱ्यांनीं कायदे पाळावयास हवे होते कीं, माणसांसारखें उभे






राहून रझाकारांना परतवावयास हवें होतें ? स्वरक्षणा-साठीं इतर उपाय नसतील तर बंदूक घ्यावी असें खुद्द गांधीजी म्हणत. तोच नियम व्यापक समाज-जीवनांत लोकक्रांतीच्या वेळीं उद्‌भवतो. रझाकारी काळांतला निझाम किंवा सन १९४५ नंतर अमेरिकनांचा हस्तक व देशाचा क्रूर शत्रु बनलेला चँग-कै–शेक यांनीं जनतेवर काय प्रसंग आणला, तें पाहणें जरूर आहे. असे शासकच जनतेवर कायदे-भंगाची व सशस्त्र स्व-संरक्षणाची वेळ आणतात, व म्हणूनच जगांतील इतिहासांत लोकक्रांति ही रक्तरंजितच असावयाची असें भीषण सत्य नमूद झालेलें आहे.

दहशतवादाशीं सतत व खंबीर विरोध करणारे कम्युनिस्ट लोकक्रांतीचा पुरस्कार अंतिम कर्तव्य म्हणूनच करतात व कम्युनिस्टांबरोबर प्रत्येक लोक-सत्तावादी नागरिकहि हीच भूमिका आज घेईल.

याचा अर्थ असा नव्हे कीं आज या घटकेला, भारतांतील शासनकर्ते जनतेला हा अंतिम मार्ग पत्करावयास भाग पाडीत आहेत. मुळींच नाहीं. तसें असतें तर, ( उदाहरणार्थ ), हायकोर्टाच्या निर्णया-नुसार स्थानबद्धांची सुटका करण्याऐवजीं सरदार पटेलांनीं हायकोर्टेंच बरखास्त केलीं असतीं ! फॅसिस्ट सत्ताधाऱ्यांनीं तसें केलेंहि. पण येथील सत्ताधारी फॅसिस्ट नाहींत. भारतीयांच्या जुन्या न्यायविषयक कल्पना व ब्रिटिशांनीं निर्माण केलेली न्यायसंस्था यांना अजूनहि येथें स्थान उरलें आहे. म्हणूनच येथें आज सोव्हिएट आणे चीनप्रमाणें परिस्थिति आहे असें म्हणणें व त्या आधारानें सशस्त्र लढ्यासाठीं मुक्तिफौजा उभारण्याची घोषणा करणें चुकीचें आहे. तेलंगणांतहि रझाकारी काळांत सशस्त्र लढ्याचीच परिस्थिति निझामानें निर्माण केली व तेलंगणाला कम्युनिस्टांच्या नेतृत्वाखालीं शेतकऱ्यांनीं मुक्त केलें याबद्दल त्यांना दुवाच द्यावा लागेल. पण निझाम शरण येऊन संघराज्याची सत्ता येतांच तेलंगणाचा ' मुक्त प्रदेश ' संघराज्याविरुद्ध लढवीत राहणें मात्र चूक होतें. रझाकारी काळांत तेथील शेतकऱ्यांनीं जमिनी ताब्यांत घेऊन त्यांचें योग्य वांटप केलें होतें. त्या वांटपाला कायदेशीर रूप देण्याची मागणी त्या वेळीं करावयास हवी होती व त्या मागणीसाठीं स्टेट काँग्रेसचें व बाहेरच्या भारतीय लोकपक्षांचें बळ एकवटणें सहज शक्य होतें. पण ' सशस्त्र लढा ' चालूं राहिल्यामुळें जमिनीच्या वांटपाचा खरा प्रश्न डावलून लष्करी बळ वापरणें सरकारला शक्य झालें. आजच्या घटकेला संघराज्याविरुद्ध सशस्त्र लढा कर-ण्याची परिस्थिति व नैतिक गरज उत्पन्न झालेली नाहीं. ही गोष्ट न कळल्यामुळें भारतीय कम्युनिस्ट पक्षाची ही चूक होत गेली. ती आज नीट सुधारणें व तेलंगणांतील जमीन-वांटपाचा प्रश्न भारतीय जनते-पुढें आणणें जरूर आहे.

तेलंगणाबाबत व एकंदर आजच्या परिस्थिती-बाबत अजूनहि कम्युनिस्टांच्या नव्या मध्यवर्ती कमिटीनें योग्य भूमिका घेतली आहे असें दिसत नाहीं. पण तशी भूमिका घेण्याची सुबुद्धि त्यांना परिस्थितीमुळें लौकरच होईल, आणि परिस्थितीला खरा गुरु मानण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत येईल, अशी मला अजून आशा वाटते. पण भारतीय जनते-पुढचे प्रश्न कोणासाठींच अडून बसणें शक्य नाहीं. सारेच लोकपक्ष आणि काँग्रेस ह्या जुन्या लोक-पक्षांतील अनेक कार्यकर्तेहि, नव्या उमेदीनें, दक्ष-तेनें व लोकसेवेच्या निष्ठेनें एकत्र येण्याचा हा क्षण आहे.

काँग्रेस जरी गांधीयुगांतून नव्या सत्ता युगांत उतरली असली तरी, लोकसेवेचें ब्रीद घेऊन आमरण झगडणाऱ्यांची काँग्रेसनेंच निर्माण केलेली परंपरा या काळांतहि मेलेली नाहीं. जुन्या व नव्या लोकपक्षांतून असे नवे कार्यकर्ते निर्माण होत आहेत व काँग्रेसनें एका काळीं घोषिलेलें जनराज्याचें स्वप्न तेच पुरें करून दाखवतील यांत शंका नाहीं. या नव्या आघाडींतच खऱ्या लोकसेवक काँग्रेस-वाल्यांचेंहि स्थान आहे व त्यांच्या ध्येयवादाची पूर्ति आतां या आघाडींत लढणाऱ्या लोकसेवक कार्य-कर्त्यांच्या बरोबर राहून नवें भारतीय जनराज्य निर्माण करण्यांतच आहे.








श्री. अ ण्णा सा हे ब स ह स्र बु द्धे

# विधायक कार्यकर्त्यांचें यापुढील कर्तव्य

## विधायक कार्यकर्त्यांमधील दोन गट

एप्रिलमध्यें अकोला (जिल्हा अहमदनगर) येथें विधायक कार्यकर्त्यांचें एक संमेलन महाराष्ट्र कॉंग्रेस—कमिटीतर्फे तीन दिवस भरलें होतें. त्या ठिकाणीं स्वतःस विधायक कार्यकर्ते मानणारांचा एक गट होता. कायदेमंडळांतहि कार्य करणारे अनेक कार्यकर्ते त्या ठिकाणीं हजर होते. सरकारचे प्रतिनिधी म्हणून कांहीं मंत्री-उपमंत्री वरील संमेलनासाठीं आलेले होते. वरील तीनहि प्रकारचे कार्यकर्ते स्वतःस विधायक कार्य-कर्ते समजणारे असले तरी, परस्परांच्या कामांत एकसंधीपणा व एकसूत्रपणा निर्माण होण्याच्या दृष्टीनें कांहीं तरी केलें पाहिजे हें सर्वांसच जाणवत होतें. कायदेमंडळांत किंवा कॉंग्रेसमध्यें काम करणारांना आपणांस विधायक कार्यकर्त्यांचें सहकार्य मिळत नाहीं असें वाटतें. कित्येक वेळां विधायक कार्यकर्ते ही एक आपल्या मार्गांतील अडगळ आहे असेंहि त्यांना वाटतें. उलट, विधायक कार्यकर्त्यांना राजकीय आघाडीवर काम करणाऱ्या लोकांविषयीं आपलेपणा वाटण्याऐवजीं त्यांना विरोध करण्याची इच्छा उत्पन्न होते. स्वातंत्र्या-नंतर राजकीय आघाडीसाठीं कॉंग्रेसनें स्वतंत्र राजकीय पक्ष निर्माण करावयास पाहिजे होता व कॉंग्रेसला लोकसेवासंघाचें स्वरूप देऊन तिनें विधा-यक कार्यास वाहून घ्यावयास पाहिजे होतें, असें आज अनेकांना वाटतें. तसें झालें असतें तरी सुद्धां राजकीय आघाडीलाच प्रामुख्य देणारे व विधायक कार्य प्रमुख मानणारे यांच्यांतील संघर्ष टळला असतां असें नाहीं. म. गांधींसारखा असामान्य पुढारीच या दोन प्रवृत्तींची सांगड घालून दोन्हीहि प्रवृत्तींच्या कार्यकर्त्यांना एकमेकांना पूरक बनवूं शकला असतां. तसें घडवून आणण्याइतकें अ-सामान्य पुढारीपण प्रान्तोप्रान्तीं आज उपलब्ध नाहीं. यापुढें विधायक कार्यकर्त्यांना आपल्या पक्षाच्या अंकित राहूनच काम करावें लागेल किंवा स्वतंत्रपणानें काम करीत राहून पक्षावर नैतिक दडपण आणण्याचें काम करावें लागेल. अकोला-संमेलनांत जरी सर्वच विधायक कार्यकर्ते जमले होते, तरी खरा प्रश्न हा होता कीं, जमलेल्या विधायक कार्यकर्त्यांनीं कॉंग्रेस पक्षाच्या अंकित राहून काम करावें किंवा त्यांना स्वतंत्रपणानेंहि काम करतां येणें शक्य व्हावें ? जर स्वतंत्रपणें कोणी काम करूं म्हणेल तर, कॉंग्रेसनें त्याच्याकडे आपलेपणानें पाहवें किंवा त्यांना परके समजावें ?

## स्वातंत्र्योत्तर परिस्थिति

विधायक कार्यकर्त्यांचा एक गट आपल्या देशा-मध्यें स्वातंत्र्यसंग्रामकालांत श्रमविभागाच्या दृष्टीनें वेगळा केला गेला. अखिल-भारत-चरखा-संघ, ग्रामोद्योग-संघ, नअी-तालिमी-संघ, राष्ट्रभाषा-प्रचार-संघ, गोसेवा-संघ, हरिजन-सेवक संघ वगैरे संस्थांतून हजारोंनीं विधायक कार्यकर्ते देशांत काम करीत राहिले. कॉंग्रेसच्या दैनंदिन कार्यक्रमांत ते भाग घेत नसत; परंतु त्या सर्व कार्यकर्त्यांना कॉंग्रेस ही आपली राजकीय आघाडी वाटत असे व कॉंग्रेसच्या लोकांनाहि जनतेपर्यंत पोंचण्यास या सर्व विधायक कार्यकर्त्यांचा व त्यांच्या प्रवृत्तींचा उपयोग होत असे. म. गांधी हे एक असामान्य दुवा होते. ते विधा-यक कार्यकर्त्यांना मार्गदर्शन करीत होते व कॉंग्रे-






सचेहि तेच नेते होते. आखिल भारतीय स्वरूपाच्या ह्या सर्व संस्था म. गांधींनीं जनसेवेच्या प्रयोगशाळा ह्या स्वरूपांत चालविल्या. कॉंग्रेसच्या द्वारेंच ह्या सर्व संस्था जनतेपर्यंत पोंचत असत. व ह्या संस्थांच्या द्वारेंच कॉंग्रेसची शक्तीहि संघटित होत असे. दोघांमधील एकसंधीपणा अविभाज्य असा होता. स्वातंत्र्य संग्रामासाठीं एक नैतिक प्रतिसत्ता निर्माण करण्याचें काम कॉंग्रेसला करावयाचें होतें. व अशी प्रतिसत्ता निर्माण करण्याला ह्या सर्व विधायक कार्यक्रमाच्यासंस्थांचा उपयोग झाला.

स्वातंत्र्यानंतरच्या आजच्या नवीन बदललेल्या परिस्थितींत विधायक कार्याची व कार्यकर्त्यांची वरील स्थिति राहिलेली नाहीं. नैतिक का होईना, प्रतिसत्ता निर्माण करण्याचें काम आज आवश्यक नाहीं असें कॉंग्रेसनेत्यांना वाटत आहे. आज कॉंग्रेसपक्ष सत्तारूढ आहे. विधायक कार्यकर्त्यांपैकीं ३/४ कार्यकर्ते सरकारी किंवा निमसरकारी संस्थांच्या यंत्रणेंतून काम करूं लागले आहेत व राहिलेले तद्वत् करूं लागतील अशी अपेक्षा आहे. नजीकच्या भविष्यांत तरी विधायक कार्यकर्त्यांना स्वतंत्र अस्तित्व राहणार नाहीं अशी स्थिति आज निर्माण झालेली आहे. अखिलभारतीय स्वरूपाच्या संस्था आज तांत्रिक प्रयोग करण्यांत गुंतल्या आहेत. त्यांचा जनतेशीं संबंध कमी कमी होत चाललेला आहे. वरील स्थितीचा परिणाम म्हणूनच सरकारच्या यंत्रणेंतून विधायक कार्य करणारे किंवा कॉंग्रेस पक्षातर्फे काम करणारे यांचें मुख्य काम सरकारच्या विधायक योजनांचा प्रचार करणें हेंच झालेलें आहे व ते आपापल्या परींनीं सरकारच्या विधायक योजना जनतेपर्यंत पोंचविण्याचा प्रयत्न करीत आहेत. परन्तु सत्तारूढ पक्ष ह्या जनताभिमुख राहूं शकतोच असें नाहीं. आज कॉंग्रेस व विधायक कार्यकर्ते जनतेपासून दूर दूर जात आहेत. त्यांची जनतेच्या मनावरील पकड आज कमी कमी होत आहे, याची जाणीव कॉंग्रेस व विधायक कार्यकर्त्यांतहि दिसून येत आहे.

आजच्या घटकेला स्वतंत्रपणें विधायक ( रचनात्मक ) कार्य करणारे किंवा कायदेमंडळांतून कार्य करणारे किंवा सरकारच्या यंत्रणेंतून विधायक कार्य करणारे अशा तऱ्हेचा भेदाभेद करण्याची आवश्यकता नाहीं. तिन्ही क्षेत्रांत काम करणारे लोक आपापल्या परींनीं विधायकच काम करीत आहेत असें आपण समजलें पाहिजे. पूर्वी श्रमविभागाच्या दृष्टीनें जरी वेगवेगळे वर्ग पडले असले तरी, त्यांच्यांतील अंतर आज नाहींसें होत चाललें आहे. अमकें काम श्रेष्ठ व अमकें काम कनिष्ठ असा भेदाभेद करण्याची आवश्यकता आज राहिलेली नाहीं. विधायक कार्यक्षेत्रांत ज्यांचा सखोल अभ्यास व विशेष कर्तबगारी दिसून आली आहे त्यांना समाजामध्यें व राजदरबारींसुद्धां योग्य मानाचें स्थान मिळालें आहे किंवा मिळूं शकेल अशी आजची परिस्थिति आहे. जे आज कायदेमंडळांत काम करीत आहेत ते पूर्वीच्या घोषणांच्या राजकारणावरच सार्वजनिक जीवनाची इमारत बांधीत राहिल्यास त्यांनाहि मागें पडावें लागेल व नवीन होतकरू लोक पुढें येतील. तेव्हां अमक्या एका क्षेत्रांत काम करणारा श्रेष्ठ किंवा तमक्या क्षेत्रांत काम करणारा कनिष्ठ अशा प्रकारचा उच्चनीच भाव कुणाच्या मनांत असेल, तर तो आज काढून टाकण्याची आवश्यकता आहे.

## केवळ विश्वस्ताची भूमिका सोडली पाहिजे

या प्रश्नाची दुसरीहि एक बाजू आहे. ती आज आपण नीट समजून घेणें आवश्यक आहे. गेल्या ३०-४० वर्षांच्या सार्वजनिक जीवनाचें निरीक्षण केल्याशिवाय मध्यमवर्गीय पांढरपेशे लोक सार्वजनिक जीवनांत प्रामुख्यानें काम करीत होते असें दिसून येईल. त्यांनीं त्यागहि केला व त्यांच्या पुढारीपणाखालींच जनतेनें राजकीय क्रांति यशस्वी रीतीनें घडवून आणली. परंतु यापुढें सामाजिक व आर्थिक क्रांति घडवून आणणें हें कार्य असून तेंच विधायक कार्याचें उद्दिष्ट झालें पाहिजे. ही सामाजिक व आर्थिक क्रांति घडवून आणण्याचें कार्य पांढरपेशा समाजाकडून होईल अशी फारच थोडी आशा आज दिसत आहे. हे पांढरपेशे कार्यकर्ते देशाच्या आर्थिक प्रश्नांची उकल करण्याकरितां योजना करीत असले तरी त्यांच्या त्या योजना कागदी आहेत. जनतेला बरोबर घेऊन जनतेच्या स्फूर्तीनें अनेक विधायक योजना पार पाडण्याची आजच्या पुढारीपणांत शक्ति उरलेली नाहीं. त्यासाठीं श्रमजीवी वर्गांतूनच नवीन पुढारी यावे लागतील. श्रमजीवी कार्यकर्त्यांच्या अनुभवांतून








# विधायक कार्यकर्त्यांचें यापुढील कर्तव्य

देशांत हळूंहळूं संघटना वाढवावी लागेल व या नवीन श्रमजीवी वर्गातील पुढाऱ्यांकडूनच देशव्यापी विधायक कार्याला चालना मिळूं शकेल. आजच्या विधायक दृष्टि असणाऱ्या कार्यकर्त्यांना जर कोणतें एक कार्य करणें शक्य असेल तर तें फक्त एवढेंच आहे कीं, या उदयोन्मुख नव्या कार्यकर्त्यांना मदत करणें, त्यांना हवें असेल तें मार्गदर्शन करणें व त्यांची शक्ति, योग्यता व कार्यक्षमता वाढविण्याला स्वतः सहायभूत होण्याचा प्रयत्न करणें. विधायक कार्यक्षेत्रांतील हल्लींच्या कार्यकर्त्यांना यापेक्षां दुसरें विशेष कांहीं काम आज करतां येणार नाहीं. पूर्वींप्रमाणेंच जर तें काम करीत राहतील तर, त्यांच्या कार्याचा जनतेवर कांहीं परिणाम होणार नाहीं. उलट, त्यांच्याकडे सांप्रदायिक कर्मठपणाच्या दृष्टीनें पाहिलें जाईल. सरकारहि त्यांची कदर करूं शकणार नाहीं. जनतेलाहि आकर्षित करण्याचें सामर्थ्य त्यांच्या ठिकाणीं येणार नाहीं. म्हणून पारतंत्र्यांत असतांना सरकारचा निरोध व रोष असूनहि जितकीं विधायक कार्यें होत होतीं किंवा त्या कार्यास जी धार येत होती, तितकें कार्य आज सरकारतर्फे सर्व प्रकारची मदत मिळत असूनहि होऊं शकत नाहीं; किंवा त्याचा वातावरण निर्माण करण्याच्या दृष्टीनें विशेषसा परिणाम आज होत नाहीं, असें अनुभवास येत आहे. विधायक कार्यकर्त्यांनीं आजच्या बदललेल्या परिस्थितींत पुनः सर्वच दृष्टींनीं फेरविचार करण्याची वेळ आली आहे, असें समजाव्यास पाहिजे व कालानुकूल पावलें टाकण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

## जनताभिमुख होण्याचा मार्ग

म. गांधींनीं देशापुढें विधायक आर्थिक कार्यक्रम ठेवला. त्यांनीं विश्वस्ताच्या भूमिकेंतून काम करणाऱ्या हजारों संस्था निर्माण केल्या. त्या संस्था चालविणाऱ्या कार्यकर्त्यांचा एक वर्गहि त्यांतून निर्माण झाला. त्यांनीं कामहि डोळ्यांत भरेल असें करून दाखविलें. परंतु कालान्तरानें त्या कामाला मर्यादा पडूं लागल्या. चरखा-संघ, ग्रामोद्योग-संघ, किंवा इतर अखिलभारतीय स्वरूपाचीं सर्व कामें आज हजारों ठिकाणीं या विश्वस्ताच्या भूमिकेंतून चाललीं आहेत. अनुभवी, त्यागी व तज्ज्ञ असे अनेक कार्यकर्ते या संस्थांच्या द्वारें आज देशभर कार्य करीत आहेत. परंतु ज्यांच्यासाठीं त्यांचें हें काम चाललें आहे त्यांची कार्यक्षमता वाढविण्याच्या दृष्टीनें आम्हीं जवळ जवळ अयशस्वी झालों आहोंत, असाहि दुःखद अनुभव आज कार्यकर्त्यांना येत आहे. चरखा संघाचा ५–७ लाख कांतणारा, विणणारा व पिंजणारा कारागीर वर्ग याला आम्हीं काम दिलें; मजुरी म्हणून पैसेहि दिले. कालौघाबरोबर त्यांच्याहि ठिकाणीं आज जागृति निर्माण झाली आहे. २५ वर्षांपूर्वीपेक्षां आज ते जास्त सज्ञान झाले आहेत. त्यांचे हक्क, कर्तव्य त्यांना जास्त समजूं लागलीं आहेत. हें जरी खरें असलें तरी सामाजिक, राजकीय व आर्थिक या दृष्टीनें त्यांना आम्हीं आमच्या पातळीवर आणूं शकलों नाहीं हें कटु सत्य आहे. कार्यकर्ता वर्ग व हा सारा कारागीर वर्ग यांच्यांत अद्याप फार मोठें अंतर आहे व विश्वस्ताच्या भूमिकेंतून काम करणाऱ्या आम्हां लोकांना तें अंतर जाणूनबुजून कमी करण्याच्या प्रयत्नात अपयश नसलें तरी फारच अल्प यश मिळालें आहे हें निश्चित. जसें नवीन पुढारीपण आज निर्माण होण्याची आवश्यकता आहे व तें श्रमजीवी वर्गांतूनच कार्यकर्त्यांचा वर्ग निर्माण होऊन निर्माण झालें पाहिजे, तसेंच विधायक कार्याची दिशाहि आज आपणांस बदलली पाहिजे. विश्वस्ताच्या भूमिकेंतून चांगलें काम होत आलें असलें तरी सुद्धां त्या भूमिकेंतून काम करण्याचा मोह विधायक कार्यकर्त्यांनीं यापुढें सोडून दिला पाहिजे. यापुढें आर्थिक, सामाजिक किंवा इतर समस्या सोडविण्याचे मार्ग शोधिले पाहिजेत. त्या त्या क्षेत्रांत सहकारी संस्था निर्माण करून त्या, सहकारी संस्थांतील सभासदांनींच सामुदायिक जबाबदारीवर चालवावयाच्या आहेत, अशा जाणिवेंतून निरनिराळीं नवीन कामें उभारलीं गेलीं पाहिजेत. अशा सहकारी संघाचा एक घटक म्हणूनच आजच्या व उद्यांच्या कार्यकर्त्याला काम करतां आलें पाहिजे. एखाद्या सहकारी संस्थेचा तो एक वर्ष व्यवस्थापक असेल, तर दुसऱ्या वर्षीं दुसराच कोणी व्यवस्थापक होईल. व स्वतः विधायक कार्यकर्ता सामान्य सभासद म्हणून इतरांप्रमाणें काम करूं लागेल. या संस्थांच्या द्वारें सर्वांचीच मानसिक उंची वाढविण्याचा प्रयत्न केला जाईल. व त्यांतूनच लोकशाहीच्या परंपरा निर्माण होतील. या








सहकारी संस्थांमधूनचें राज्ययंत्र चालवावयास लायक असे राज्यकर्तेहि आपणांस मिळूं लागतील व अभ्यासू तज्ज्ञ कार्यकर्त्यांचा वर्गहि निर्माण होईल. यापुढचें सर्व विधायक काम व्यक्तिनिष्ठ राहण्याऐवजी ग्रामपंचायतींच्या द्वारां किंवा विविध कार्यें करणाऱ्या ग्रामीण संघांच्या द्वारां किंवा एखाद्या उत्पादक वा ग्राहक सहकारी संघाच्या द्वारां करण्याचा प्रयत्न आपण केला पाहिजे. अशा योगानेंच सर्वांची उंची वाढविण्याला आपल्या विधायक कार्यक्रमाचा उपयोग होऊं शकेल.

वरील दृष्टीनें विधायक कार्य करण्यास आपण किती लायक आहोंत याचा विचार विधायक क्षेत्रांत काम करणारांनीं आपल्या मनाशीं ठरवावा. आजच्या पांढरपेशा बुद्धिजीवी वर्गांतील विधायक कार्यकर्त्यांना वरील तऱ्हेचें काम करतां येणें शक्य नाहीं असें वाटल्यास त्यांनीं स्वतंत्रपणें कोठें तरी कांहीं तरी करीत राहण्याऐवजीं एक तर सरकारच्या यंत्रणेंतून काम करण्यास लागावें किंवा उच्च वर्गाभिमानाच्या वर्ग-श्रेणींतून खालीं उतरून, ( declassed ) श्रमजीवी बनून वरील सहकारी जीवनाच्या निर्मितीच्या प्रयत्नास लागावें व जनतेशी एकरूप व्हावें. जनताभिमुख होण्याचा हाच मार्ग आहे.

## विधायक कार्यकर्त्यांचें राजकारणनिरपेक्ष स्थान

गेल्या ३०-४० वर्षांत परकीय सत्तेला घालविण्याचें काम कॉंग्रेसतर्फे चालू होतें. देशाचे आपण एकमेव प्रतिनिधि आहोंत, असा दावा कॉंग्रेसतर्फे केला जाई व देशांतील बहुसंख्य लोक कॉंग्रेस ही आपली प्रतिनिधि-स्वरूप आहे असें मानीत असत. सरकारशीं झगडणारी, राजकीय क्रांति करणारी ती एकमेव संस्था होती, याविषयीं संशयच नव्हता. स्वातंत्र्यानंतर कॉंग्रेस एक अधिकारारूढ पक्ष बनला. सर्व देशाचें प्रतिनिधित्व करण्याचा दावा आज कॉंग्रेस करूं शकत नाहीं अशी परिस्थिति निर्माण झाली आहे. इतर राजकीय पक्ष आज देशांत निर्माण झाले आहेत व त्यांच्यातर्फेहि आज विधायक कार्य चालू आहे. पक्षनिष्ठ कार्यकर्त्यांला नेहमींच राजकारणाकडे पाहावें लागतें; दूरच्या भविष्याकडे पाहण्याऐवजीं तातडतोबीच्या प्रश्नांना महत्त्व द्यावें लागतें. पक्षसंघटनेला उपयुक्त अशींच कार्यें हातीं घेतलीं जातात व चालविलीं जातात. परंतु विधायक कार्यकर्त्यांची गोष्ट निराळी आहे. त्यांना आपणापुढें असलेल्या प्रश्नांचा खोलवर अभ्यास करावा लागतो; ५-२५ वर्षांचा काळ डोळ्यांपुढें ठेवून योजना आंखाव्या लागतात. निदान अशी त्यांच्या-संबंधीं अपेक्षा असते. यामुळेंच अनेक वेळां राजकीय पक्ष त्यांच्या कामाकडे उदासीनतेनें पाहातात. कित्येक वेळा तर त्यांच्या कामाला विरोधहि केला जातो. खऱ्या विधायक प्रवृत्तीच्या कार्यकर्त्यांना सत्तारूढ पक्षातर्फे असा विरोध केला जाईल, एवढेंच नव्हे तर, कोणत्याहि राजकीय पक्षांत राहून विधायक कार्य करीत राहिल्यास ते कार्यकर्ते अडगळीसारखे वाटूं लागतील. त्यांची अनेक वेळां उपेक्षाही केली जाईल. म. गांधींना विधायक कार्यांच्या द्वारेंच स्वराज्य निर्माण करावयाचें होतें. "Fulfilment of Constructive Programme is Swaraj" अशी स्वराज्य-निर्मितीची त्यांची कल्पना होती. हीच कल्पना डोळ्यांपुढें ठेवून विधायक कार्यकर्त्यांनीं कार्य करण्याचा विचार केला पाहिजे. राजकीय आघाडी म्हणून त्याला अमका एक पक्ष जवळचा वाटावा व त्या पक्षाला त्यानें मदत करीत राहावें ही गोष्ट परिस्थितिसापेक्ष आहे. सामान्यतः तो अशी मदत करीत राहीलहि. परंतु सत्तारूढ पक्षाचीच राजकीय आघाडी तो मानीत असूनसुद्धां तो सत्तेच्या विरुद्ध नैतिक झगडा करूं शकेल, आपल्या राजकीय पक्षावर टीकाहि करूं शकेल. त्या राजकीय पक्षाचा कोपहि त्याला सहन करावा लागेल. अशाहि स्थितींत त्याला आपलें काम करीत राहिलें पाहिजे. आपल्या कार्याच्या प्रभावानें राज्यसत्तेलाहि सुधारण्याचा प्रयत्न करण्याची महत्त्वाकांक्षा त्यानें राखिली पाहिजे. अशा दृष्टीनें विचार करणाऱ्या विधायक कार्यकर्त्याला अमक्या एका राजकीय पक्षाशीं निगडित राहण्याची किंवा एखाद्या पक्षाच्या सर्वस्वीं अधीन होऊन काम करीत राहण्याची आवश्यकता राहूं नये.

---





अनुक्रमणिका

आचार्य वि. प्र. लिमये

# काँग्रेसचें यशापयश

ज्या संस्थेचा सभासद म्हणून आपलें जवळजवळ सर्व जाणतें आयुष्य माणसानें घालविलेलें असतें त्या संस्थेच्या कामगिरीविषयीं, तिनें काय साधलें, न साधलें याविषयीं निर्विकारपणें आपलें मनोगत शब्दांनीं व्यक्त करणें हें त्या माणसाला जरा अवघड होऊन बसतें. परंतु कित्येक प्रसंग असे असतात कीं त्यांच्या निमित्तानें सदर काम जाहीरपणें करावें लागतें. महाराष्ट्रापुरतें बोलावयाचें झाल्यास काँग्रेस अधिवेशनाची महापर्वणी फैजपूरनंतर चौदा वर्षांनीं नाशकास येत आहे. म्हणून 'यशो ऽ यशः' हे भूतभाव पृथग्विध मानूनही ते परमेश्वरापासूनच निर्माण झाले आहेत ही भावना सदा आणि सर्वत्र राहूं शकत नसली, तरी ती निदान या क्षेत्राच्या ठिकाणीं व या पर्वकाळीं मनांत वागवून कार्याला प्रवृत्त होत आहे.

## काँग्रेसच्या राजकीय भवितव्याचीं मुळें

१८८५ सालीं काँग्रेसचें पहिलें अधिवेशन मुंबईस भरलें. त्यावेळीं महाराष्ट्रांतील प्रतिनिधिमंडळींत 'ज्ञानप्रकाश', 'सार्वजनिक सभेचें त्रैमासिक', 'मराठा', 'केसरी', 'इंदुप्रकाश' या वृत्तपत्रांचे व नियतकालिकांचे संपादक, पुण्याचे वामन शिवराम आपटे व गोपाळ गणेश आगरकर, मुंबईचे काशिनाथ त्र्यंबक तेलंग आणि नारायण गणेश चंदावरकर ही मंडळी प्रामुख्यानें होती. महादेव गोविंद रानडे. जरी सभेला हजर होते तरी सरकारी नोकरींत असल्यामुळें त्यांचा प्रतिनिधींत समावेश होऊं शकला नाहीं. या यादीवरून लक्षांत येईल कीं संपादक, शिक्षक व वकील ही नवशिक्षित मंडळी या कामांत पुढारी होती. सरकारी नोकरांना अजीबात मज्जाव नव्हता. अशा स्थितींत पहिल्या अधिवेशनांत मंजूर झालेले ठराव कशा प्रकारचे असूं शकतील याची सहज कल्पना करतां येईल. हे ठराव म्हणजे भावी काळांत काँग्रेसनें ज्या राजकीय मागण्या केल्या त्यांचीं मुळेंच होत. हिंदुस्थानच्या राज्यकारभाराची चौकशी करण्याकरितां रॉयल कमिशन; आय. सी. एस. ची परीक्षा हिंदुस्थानांत व विलायतेंत, दोन्हीं ठिकाणीं एका वेळीं घेणें; अवाढव्य लष्करी खर्च कमी करणें; उत्तर-ब्रह्मदेश ब्रिटिश सत्तेखालीं आणल्याबद्दल निषेध; या विषयांसंबंधीं ठराव मंजूर झाले. साध्य-साधनासंबंधींचे जे ठराव असतात त्यांना आपण मुख्य ठराव म्हणतों. त्या संबंधींची अगदीं अंधुक कल्पना पुढील दोन ठरावांत दिसून येते : १) लेजिस्लेटिव्ह कौन्सिलांत सर्व सभासद सरकारनियुक्त होते त्यांत कांहीं लोकनियुक्त सभासदांचा समावेश करणें, सभासदांना प्रश्न विचारण्याचा हक्क असणें; संयुक्त-प्रांत व पंजाबमध्यें ले० कौन्सिलें निर्माण करणें इ० बाबी असलेला. हा ठराव आधुनिक दृष्टीनें, महत्त्वाचा मानला जाईल. २) मंजूर झालेले ठराव देशांतील निरनिराळ्या राजकीय संस्थांकडे पाठविणें, त्यांच्यावर त्या संस्थांतून व जाहीर सभांतून चर्चा करणें व त्यांना पाठिंबा देणें, या संबंधींचा ठराव. हाहि महत्त्वाचा मानला पाहिजे. परंतु त्यावेळीं ते तसे मानले गेले कीं नाहीं याविषयीं मात्र जबरदस्त शंका आहे. राज्यकारभाराच्या चौकशीसाठीं रॉयल कमिशनची मागणी पाहिली म्हणजे पुढें १९३९ सालीं मि. जिना यांनीं काँग्रेसच्या प्रांतिक सरकारांच्या कारभाराविषयींची चौकशी करण्यासाठीं मागितलेल्या





अनुक्रमणिका

रॉयल कमिशनची आठवण होते. पूर्वी अशीं कमिशनें नेमण्याची प्रथा रूढ होती; त्यामुळें पुष्कळ चांगली माहिती जमा होई; सुधारणांबाबत शिफारसी होत; पण प्रत्यक्ष अंमलबजावणी फार अल्प होई. आय. सी. एस.ची मोहिनी अजूनहि थोड्या-फार प्रमाणांत आपल्यावर आहे; मग त्यावेळीं किती मोठ्या प्रमाणांत असेल याची या ठरावावरून कल्पना येते. खुल्या चढाओढीमध्यें शिरून आपल्या अंगच्या गुणांवरून बडी, मानाची, सत्तेची, पैशाची नोकरी मिळविणें म्हणजे आयुष्याची इतिकर्तव्यता ! आज ही स्थिति पालटत चालली आहे—अवाढव्य. लष्करी खर्च गरीब हिंदुस्थानावरचा भयंकर बोजा होय, १९३० सालीं दांडीला सत्याग्रहासाठीं निघण्यापूर्वीं महात्मा गांधींनीं स्वराज्याचा गाभा म्हणून ज्या अकरा मागण्या मांडल्या होत्या, त्यांत लष्करी खर्च शेंकडा ५० टक्क्यानीं कमी करावा ही एक प्रमुख मागणी होती. यावरून हें शल्य पहिल्यापासून आपणांस कसें बोचतें आहे, हें लक्षांत येतें—ब्रह्मदेशासंबंधींचा ठराव म्हणजे आणखी एक नवा देश पारतंत्र्यांत गेला, यासंबंधीं खेद व्यक्त करणारा होय. आपण एक परदास्यांत सांपडलों ते सांपडलों, इतरांच्यावर तशी पाळी येऊं नये, ही सद्भावना त्याच्या बुडाशीं होती. ब्रह्मदेश हिंदुस्थानाला जोडूं नये, असें म्हणणाऱ्या काँग्रेसवर पुढें १९३१ सालीं कराचीस ठराव करावासा वाटला कीं ब्रह्मदेश विभक्त करूं नये ! पुढें १९३५ च्या कायद्यानें ब्रह्मदेश स्वतंत्र देश झाला व ज्या कराचींत वरील ठराव झाला ती कराचीहि विभक्त झालेल्या पाकिस्तानची राजधानी झाली, हा भाग निराळा.

## राजकीय साध्य-साधनांचा विकास व परिणति

राज्यकारभार सुधारावा, प्रजेचीं गाऱ्हाणीं मिटावींत, गरीब जनतेवरील कराचा बोजा कमी करावा, नोकऱ्यांत हिंदी लोकांना समान वाव मिळावा, यांच्यापलीकडे जाऊन मुळांतच राज्यसत्तेचें अंशभागी आपण व्हावें या भावनेचा उदय हळूंहळूं, फार उशीरानें होत गेला. कायदेकौन्सिलांचें महत्त्व जरी वाटत होतें तथापि त्याबाबत मागितलेल्या दुरुस्त्या पाहिल्या म्हणजे आज आपणांस त्यांचें हसूं येतें. काय म्हणे, थोडेसे लोक तरी निवडणुकीच्या मार्गानें कौन्सिलांत जावेत ! किती भीत भीत मागणी केली आहे ! कौन्सिलांत राज्यकारभारासंबंधीं प्रश्न विचारण्याची परवानगी असावी ! ! ती देण्यांत आल्यावर उपप्रश्न विचारण्याचा हक्क मिळावयाला आणखी किती तरी वर्षें जावीं लागलीं. तात्पर्य, पार्लमेंट व त्याला जबाबदार असलेलें सरकार, ही जी स्वराज्याची मुख्य मागणी, तिचा सुगावा १९२० पर्यंतच्या काँग्रेस-राजकारणांत फारसा लागत नाहीं. १९१६ सालीं इंडियन नॅशनल काँग्रेस व मुस्लिम लीग या दोन संस्थांनीं मिळून जी योजना तयार केली, तिच्यावर मॉर्टफर्ड रिपोर्टांत जी टीका केली आहे तीवरून ध्यानांत येतें कीं त्यावेळच्या एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलमध्यें हिंदी लोक घ्यावेत व लेजिस्लेटिव्ह कौन्सिलमध्यें बहुतेक सभासद लोकनियुक्त असावेत, एवढीच मागणी होती. हें कार्यकारी मंडळ न काढतां येण्याजोगें ( irremovable ) होतें, अशी योग्य टीका मॉंटेग्युसाहेबानें केली व त्या ऐवजीं लोकमंत्र्यांना जबाबदार ( responsible ) करणारी द्विदल राज्यपद्धति त्यानें सुचविली. या दृष्टीनें पाहिल्यास १९१९ चा कायदा व १९३५ चा कायदा, या स्वराज्याच्या मंदिरांत चढून जाण्याच्या पायऱ्या ठरल्या. आणि शेवटीं १९४७ चा ' इंडियन इंडिपेंडन्स कायदा ' हें त्या मंदिराचें शिखर ठरलें.

हा झाला साध्याच्या परिणतीचा विचार. आतां साधनांसंबंधीं विचार केल्यास त्यांवर पहिल्या अधिवेशनांत विशेष भर दिलेला दिसत नाहीं; तसा तो देणें त्या परिस्थितींत शक्यही नव्हतें. लोकांच्या प्रतिनिधींनीं वर्षाकांठीं एकत्र जमून राज्यकर्त्यांपुढें ठेवण्यासाठींच्या मागण्यांना रूप देणें ( to formulate the demands ) हें प्रचाराचें पहिलें साधन. या मागण्यांना लोकांचा पाठिंबा आहे हें दाखविण्यासाठीं जाहीर सभा घेणें, परिषदा भरविणें, शिष्टमंडळें नेणें अर्ज-विनंत्या ( memorials ) तयार करून त्यांवर सह्या घेणें; या दुसऱ्या साधनाला सर्वसाधारणपणें ' लोक-जागृति ' असें मानतां येईल. वर ' लोकप्रतिनिधि ' असा शब्दप्रयोग केला आहे. पण सध्यां काँग्रेसचा ' डेलिगेट ' किंवा प्रतिनिधि व्हावयाला काय सायास पडतात हें ध्यानांत घेतलें







म्हणजे त्यावेळचें प्रतिनिधित्व किती सोपें व सहज-साध्य होतें याची कल्पना येते. ही निवड जाहीर सभेंत होत असे व ज्याला म्हणून अधिवेशनास उपस्थित राहण्याची हौस आणि ऐपत असे, तो 'डेलिगेट' म्हणून सहज निवडला जात असे. कालांतरानें सर्वच गोष्टी पालटत गेल्या. काँग्रेसचें राजकीय ध्येय अधिकाधिक स्पष्ट होत गेलें. मार्गहि व्यापक आणि विस्तृत झाले. काँग्रेस संघटनाहि नियमांनीं बांधिली गेली व तिला एक विशिष्ट तऱ्हेची शिस्त लावण्यांत आली. हा सर्व इतिहास अगदीं ताजा व अलीकडच्या पिढीला ज्ञात असल्यामुळें तो बाजूला ठेवून काँग्रेस काय करावयाला निघाली व झालें काय व आतां पुढील काळांत काय घडावयास पाहिजे, याचें थोडेसें दिग्दर्शन करितों.

## सर्वांत मोठें यश आणि अपयश

हिंदुस्थान देशाला पूर्ण राजकीय स्वातंत्र्य प्राप्त करून देणें हें काँग्रेसच्या १९२० सालानंतरच्या घटनेंतील पहिलें कलम होतें. या प्रतिज्ञेप्रमाणें १९४७ सालीं १५ ऑगस्टला हें राजकीय स्वातंत्र्य हिंदुस्थान ( इंडिआ )ला प्राप्त झालें. मात्र काँग्रेसनें आपल्या घटनेंत मानलेला 'इंडिआ' संकोच पावला. यद्यपि नवीन राज्यघटनेंत आपल्या देशाचें 'इंडिआ' हें नांव आपण कायम ठेवलें आहे, तथापि या 'इंडिआ'तून वायव्य सरहद्द प्रांत, सिंध, बलुचिस्थान, पश्चिम पंजाब, पूर्वबंगाल व आसामांतील सिल्हेट जिल्हा, इतका भाग वगळावा लागला. या भागाचें नवीन राष्ट्र 'पाकिस्तान' या नांवानें १४ ऑगस्ट १९४७ ला जन्माला आलें. ही घटना घडून येण्यासारखी जी परिस्थिति निर्माण झाली, त्या परिस्थितीवर आपणांस मात करतां आली नाहीं, मुसलमान समाजाच्या फुटीर वृत्तीस वेळींच आळा घालतां आला नाहीं, हें काँग्रेसचें अलीकडच्या काळांतील सर्वांत मोठें अपयश मानावें लागेल. त्याच्याच जोडीला हिंदुस्थान—पाकिस्तान या दोन्ही देशांना स्वातंत्र्य मिळवून देण्याची खटपट केवळ एकट्या काँग्रेसनें केली, हें तिचें उत्तमांतलें उत्तम यश होय हें सर्वांना, पाकिस्तानी मुसलमानांना देखील, कबूल करावें लागेल. कांहीं थोडे काँग्रेसनिष्ठ मुसलमान वगळल्यास 'पाकिस्तान'-घोषणेस बाकीच्या मुसलमानांनीं उचलून धरल्यामुळें व स्वयंनिर्णयाच्या लोकशाही तत्त्वास काँग्रेसनें स्वतःला बांधून घेतलें असल्यामुळें नाइलाजानें काँग्रेसला देशाच्या विभागणीस तयार व्हावें लागलें. ही अप्रिय गोष्ट करावी लागूनहि काँग्रेसनें देशाचें स्वातंत्र्य पत्करलें ही उत्तम गोष्ट झाली, असें आमचें स्पष्ट मत आहे. या घटनेवरील शेवटचा निर्णय अखेर भावी काळच देईल.

विभागणी स्वीकारतांना काँग्रेसची जी अपेक्षा होती ती मात्र अद्याप पुरी झाली नाहीं, असें खेदानें म्हणावें लागतें. दोन तुकड्यांत जें सौमनस्य नांदावयास पाहिजे तें अभावानें जणूं तळपत आहे! या तंट्यांतून, दंगलींतून निर्वासितांचा एक फार मोठा बिकट प्रश्न निर्माण झाला आहे. त्याच बरोबर पाकिस्तानांतील हिंदु-शीख अल्पसंख्यांकांच्या भवितव्याबद्दलहि साशंकता निर्माण झाली आहे. याबिाबत हिंद-पाक-कराराला संमति देऊन काँग्रेसनें फार मोठी कामगिरी केली आहे, असें आमचें निश्चित मत आहे.

## संस्थानें निकालांत निघालीं

आतां हिंदी संस्थानांचा प्रश्न घेऊं. १९३४ सालच्या सुमारास असा एक काळ होता कीं, महात्मा गांधी सुद्धां संस्थानी प्रजेच्या राजकारणांत प्रत्यक्ष ढवळाढवळ करण्यास तयार नव्हते. त्यांनीं संस्थानांना 'अफगाणिस्थाना'ची उपमा दिल्याचें कित्येकांच्या आजहि स्मरणांत असेल. परंतु १९३७ सालीं प्रांतिक स्वराज्य ( ! ) आल्यानंतर महात्माजींची व काँग्रेसची ही वृत्ति पालटली. नवीन मिळालेल्या अंशमात्र सत्तेची संस्थानांना तरफ लावण्यांत आली. 'राजकोट प्रकरण' हें उदाहरण याबाबत बस्स् आहे. त्यानंतरच्या आठ वर्षांच्या काळांत संस्थानी प्रजेची जबाबदार राज्यपद्धतीच्या मागणीची चळवळ फोफावली; व १९४७ सालांत सर्व संस्थानें हिंदुस्थानांत सामील झालीं. याला हैद्राबाद व काश्मीर हीं अपवादभूत होतीं. पोलिस-ॲक्शननंतर हैद्राबादचा प्रश्न आतां जवळजवळ निकालांत निघाल्यासारखा आहे. काश्मीरचें प्रकरण अद्याप यूनोसंघटनेंत भिजत पडलें आहे. सार्वमतानें





अनुक्रमणिका

या प्रश्नाचा कायमचा निकाल लावल्याशिवाय हिंदुस्तान व पाकिस्तान या दोन देशांमध्यें कायमची शांति नांदण्यासारखी नाहीं, ही गोष्ट स्पष्ट आहे. संस्थानी मुलख इतर मुलखाच्या बरोबरीनें येण्यास अद्यापि ८।१० वर्षांचा तरी कालावधि लागेल. या सर्व कामगिरीचें श्रेय कोणा एका व्यक्तीला द्यावयाचें झालें तर तें सरदार वल्लभभाईंना द्यावें लागेल.

### परदेशीय राजकारणः बीजाचा विशाल वृक्ष

स्वातंत्र्य मिळण्यापूर्वी कॉंग्रेसला परदेशीय राजकारण असें फारसें नव्हतेंच. जगाच्या दरबारांत परतंत्र राष्ट्राला कोण विचारतो ? तथापि foreign department काढून परदेशांतील स्वातंत्र्यप्रिय लोकांशीं व चळवळींशीं संबंध राखण्याचें व आपल्या स्वातंत्र्याच्या चळवळीला त्यांच्यामार्फत साहाय्य मिळविण्याचें काम कॉंग्रेसनें चालू ठेवलें होतें. पंडित नेहरूंच्या नेतृत्वाखालीं या बीजाचा आतां वृक्ष झाला आहे. या विशाल वृक्षाच्या शीतल छायेखालीं सर्व जगाला शांति लाभून विसांवा मिळावा, या हेतूनें व धोरणानें परराष्ट्रीय राजकारणांत पंडितजी आपलीं पावलें टाकीत आहेत. केवळ आशिआई राष्ट्रांचाच म्होरक्या नव्हे तर जागतिक महान् मुत्सद्दि अशी कीर्ति पंडितजींनीं संपादिली आहे. हा त्यांचा वैयक्तिक मोठेपणा आहेच; पण त्याच्या योगें त्यांनीं कॉंग्रेसला व हिंदुस्थानाला जगांत मानाचें व आदराचें स्थान प्राप्त करून दिलें आहे. स्वातंत्र्योत्तर काळांतील कॉंग्रेसचें हें मोठें यश आहे. अद्याप तें पुरें पदरांत पडलेलें नाहीं, परंतु पडण्याचा फार मोठा संभव आहे. कारण युद्ध व त्यांत सर्व मानवांचा व मानवतेचा नाश, आणि चिरंतन शांति व सुखाचे दिवस– या दोन्हीपैकीं कांहीं तरी एक पसंत केलें पाहिजे, अशी जगापुढें कठिण समस्या येऊन पडली आहे. कॉंग्रेसनें आपल्या नवीन ध्येयांत 'विश्वशांति व विश्वबंधुत्व' हे जे शब्द घातले आहेत, त्यांना अनुसरून आपण कांहीं काम करीत आहोंत, ही अत्यंत समाधानाची गोष्ट आहे.

### अलीकडे आलेलें शैथिल्य

त्याच नवीन ध्येयांतील 'सहकारी स्वराज्य' (Cooperative Commonwealth), 'आर्थिक व सामाजिक समता', 'सर्वांना समान् संधी' इत्यादि तत्त्वांचें आचरण अद्यापि जितक्या त्वरेनें कॉंग्रेसनें करावयास पाहिजे तितकें झालेलें नाहीं, हें मान्य करावयास पाहिजे. नवीन राज्यघटना संमत झाली; उत्तमांतले उत्तम उद्देश जाहीर झाले; परंतु कृतीच्या नांवानें अद्याप कित्येक बाबतींत नन्नाचाच पाढा वाचण्याचा प्रसंग येतो. फार वर्षें आपल्या उन्नतीचा मार्ग खुंटल्यामुळें आपण एकप्रकारें अधीर झालों आहोंत. त्या अधीरपणाला साजेसें आपल्या हातून झटपट काम होत नाहीं, यामुळें कॉंग्रेसविरुद्ध असंतोष पसरावयाला जागा झाली आहे. स्वातंत्र्ययुद्धाच्या वेळची शिस्त, प्रयत्न, तळमळ, हीं सर्व अलीकडे शिथिल झालीं आहेत. स्वातंत्र्यप्राप्तीइतकेंच नवीन ध्येय स्फूर्तिप्रद आहे हें नवीन पिढीला पटवून देऊन प्रेरणा देणारा गांधींच्या सारखा नेता हवा आहे. या गोष्टीवर भावी काळांतील कॉंग्रेसचें यशापयश अवलंबून आहे. याबाबत कॉंग्रेस अद्याप वांझ झालेली नाहीं, असा अनेकांप्रमाणें आमचाही दृढ विश्वास आहे. हा विश्वास योग्य व वाजवी ठरल्यास कॉंग्रेसच्या पुढें यश हें ठेवलेलेंच आहे.

---

### कॉंग्रेसचें मूळ स्वरूप

हिंदुस्थानांत खेड्यांतून पांगलेली अर्धपोटी, मुकी, दुबळी अशी जी लक्षावधि प्रजा आहे त्या प्रजेचें प्रतिनिधित्व हेंच कॉंग्रेसचें मूळ स्वरूप आहे. ज्या ज्या हक्कांचें संरक्षण करणें कॉंग्रेसला जरूर वाटत आहे त्या सर्व हक्कांचें संपादन शेवटीं या दीन प्रजेच्या हितासच कारणीभूत झालें पाहिजे असें कॉंग्रेसला वाटतें.

—म. गांधी (१९३१)








प्रा. नी. वि. सोवनी

# साखरेची कटु कहाणी

स्वतंत्र हिंदुस्थानांतील साखरेच्या पुरवठ्या-बाबतच्या गेल्या २–३ वर्षांतील स्थूल घटना सर्वांस परिचित आहेत. ८ डिसेंबर १९४७ रोजीं हिंदुस्थान-सरकारनें साखरेवरील सर्व निर्बंध उठविले. साखरेची नियंत्रित किंमत दर मणास रु. २२ १४ आणे होती. नि-नियंत्रण झाल्याबरोबर ती दर मणास रु. ३५-७ आणे इतकी वाढविण्यांत आली. यानंतर एक वर्षपर्यंत साखरेच्या किंमती या पातळीवर अगर तिच्या जवळपास होत्या. डिसेंबर १९४८ मध्यें हिंदुस्थान-सरकारनें हिंदी साखर-कारखानदार-संघ ( Indian Sugar Syndicate ) व प्रांतिक सरकारें यांच्याशीं विचारविनिमय करून साखरेची किंमत दर मणास रु. २८-८ आ. इतकी कमी केली. १९४९ च्या मे-जूनपासून साखरेच्या किंमती वाढूं लागल्या व साखरेची सर्वत्र हांकाटी झाली. परिस्थिति सांवरण्यासाठीं हिंदुस्थान सरकारास सप्टेंबरमध्यें पुन्हां साखरेवर नियंत्रण बसवावें लागलें, तें अद्यापिहि जारी आहे. या स्थूल घटनांमागें ज्या अनेक घडामोडी दडलेल्या आहेत, त्यांचा तपशीलवार विचार या लेखांत करावयाचा आहे. हिंदी साखर-कारखानदारांच्या संघाचा इतिहास व त्याची कामगिरी यांपासूनच या विवेचनास प्रारंभ केला पाहिजे.

१९३२ सालीं हिंदी साखरेच्या धंद्यास संरक्षण मिळून परदेशाहून येथें आयात होणाऱ्या साखरेवर दर हंड्रेडवेटास रु. ९-१-० इतकी संरक्षक जकात बसविण्यांत आली. या संरक्षक जकातीमुळें हिंदुस्थानांतील साखर-कारखान्यांच्या वाढीस उत्तेजन मिळालें व २-३ वर्षांतच त्यांत खरोखरच क्रांति घडून आली. १९३१ ते १९३५ या काळांत १०४ नवीन साखर-कारखाने हिंदुस्थानांत निघाले. व साखरेचें प्रतिवार्षिक उत्पादन १,५८,००० टनांपासून ९,१९,००० टनांपर्यंत वाढलें व जवळजवळ त्या प्रमाणांतच परदेशी साखरेची आयात कमी झाली. १९३५ मध्यें हिंदुस्थानांत एकंदर १३५ साखर-कारखाने होते; त्यांपैकीं १०० हून थोडे अधिक बिहार व युक्तप्रांत यांमध्यें होते. एकंदर देशांत तयार होणाऱ्या साखरेपैकीं साधारणपणें ¾ साखर या दोन प्रांतांतील कारखान्यांतून तयार होत असे. कारखाने व उत्पादन यांचें हें प्रमाण आजतागायत साधारणपणें तितकेंच राहिलें आहे. १९३६-३७ मध्यें साखरेचें उत्पादन निरनिराळ्या कारणांमुळें आदल्या वर्षापेक्षां २ लक्ष टनांनीं वाढलें. आयात मात्र त्या मानानें कमी झाली नाहीं. त्यामुळें साखरेचा सर्वत्र सुकाळ होऊन तिच्या किंमती पडूं लागल्या. १९३५-३६ च्या हंगामांत दर मणीं रु. ८-२-१० असलेली किंमत १९३७ जूनमध्यें रु. ६-१-६ पर्यंत उतरली व साखर-कारखान्यांवर आपत्ति कोसळली. यांतून मार्ग काढण्यासाठीं मे १९३७ मध्यें प्रथमतः साखर-कारखानदारांचा संघ काढण्यांत आला. कारखान्यांत तयार झालेल्या साखरेच्या विक्रीचें व किंमतीचें नियंत्रण करण्याच्या उद्देशानें संघ स्थापन करण्यांत आला. त्याप्रमाणें संघानें साखरेच्या विक्रीच्या किंमती ठरविल्या व प्रत्येक कारखान्याच्या उत्पादनापैकीं किती भाग कोणत्या वेळीं बाजारांत आणण्यासाठीं "मोकळा" करावयाचा हें नियंत्रित करून १९३६-३७ च्या साखर-हंगामाच्या



अनुक्रमणिका

शेवटीं शेवटीं साखरेच्या किंमती जवळजवळ दर मणीं रु. १ नें वाढविण्यांत यश मिळविलें. पुढच्या हंगामांत परिस्थिति सुधारल्याबरोबर बऱ्याच साखर-कारखान्यांनीं संघाचें सभासदत्व सोडलें. तेव्हां संघानें बिहारच्या व युक्त प्रांताच्या सरकारांकडे मदतीसाठीं मागणी केली. त्या सरकारांनीं साखर-कारखान्यांच्या नियंत्रण-कायद्यान्वयें नियमांत जरूर तो फरक करून संघाचे सभासद असल्याशिवाय त्या दोन प्रांतांतील साखर-कारखान्यांना ऊंस गाळण्यास परवानगी देण्याचें नाकारलें. त्यामुळें त्या प्रांतांतील सर्व साखर-कारखान्यांना संघाचें सभासदत्व सक्तीचें झालें. युक्त आणि बिहार प्रांताबाहेरील जे साखर-कारखाने संघाचे सभासद होते, त्यांनीं यानंतर आपलें सभासदत्व सोडलें व संघ हा त्या दोन प्रांतांतील साखर-कारखान्यांचीच संस्था झाली.

संघास अशा रीतीनें कायदेशीर मान्यता देतांना साखर-कारखाने, ऊंसाची लागवड करणारे शेतकरी व साखरेचें सर्वसामान्य गिऱ्हाईक यांच्या हिताकडे लक्ष देऊन साखरेच्या किंमती व पुरवठा यांचें योग्य तें नियंत्रण संघ करील अशी युक्त प्रांत व बिहार सरकारांची अपेक्षा होती. तथापि, लवकरच त्यांचा भ्रमनिरास झाला. साखरेचा बाजारांत येणारा सांठा मर्यादित ठेवून साखरेच्या किंमती वाढविण्याचें धोरण संघानें पुढें अविरत चालू केलें. सप्टेंबर १९३७ मध्यें दरमणीं रु. ६–७–० असलेली साखरेची किंमत डिसेंबर १९३८ मध्यें दरमणीं रु. १०–५–० पर्यंत वाढली व १९३९ च्या पहिल्या कांहीं महिन्यांतच ती दरमणीं रु. १२–०–० पर्यंत चढली. साखर-कारखान्यांमधील स्पर्धा नाहींशी करून संघानें साखर-बाजारांत आपली मक्तेदारी स्थापन केली व तिचा उपयोग फक्त साखरेच्या किंमती वाढविण्याकडे करण्याचा उपक्रम आरंभिला. तेव्हां जून १९४० मध्यें युक्त-प्रांत व बिहार सरकारांनीं संघास दिलेली कायदेशीर मान्यता काढून घेतली. त्याबरोबर पुष्कळ साखर-कारखाने संघांतून बाहेर पडले. साखर-बाजारांत पुन्हां प्राणान्तिक स्पर्धा सुरू झाली. कारखानदार वाटेल तितक्या कमी भावानें साखर विकूं लागले; त्यामुळें सर्वत्र गोंधळाची परिस्थिति निर्माण झाली व कांहीं साखर-कारखाने बंद पडण्याच्या बेतांत आले. याच सुमारास संघाच्या उरलेल्या सभासदांनीं सरकारकडे शिष्टमंडळ नेऊन संघाची काढून घेतलेली मान्यता त्यास पुन्हां द्यावी अशी विनंति केली. तेव्हां युक्त प्रांत व बिहार यांचीं सरकारें, हिंदुस्थान सरकार, इंपीरियल बँक, आणि संघ यांच्या प्रतिनिधींची एक संयुक्त बैठक जुलै १९४० च्या शेवटीं बोलावण्यांत आली. या बैठकींत चर्चा होऊन कांहीं अटींवर संघास पुन्हां सरकारी मान्यता द्यावी असें ठरलें. ३ ऑगस्ट १९४० रोजीं काढलेल्या सर्व प्रतिनिधींच्या संयुक्त पत्रकानें खालील अटींवर संघास मान्यता देण्यांत येत आहे असें जाहीर करण्यांत आलें : (१) साखरेची विक्री करण्याचें काम संघानें करावयाचें. सरकार वेळोवेळीं साखरेच्या किंमती ठरवील व साखरेच्या एकंदर सांठ्यापैकीं किती भाग कोणत्या वेळीं बाजारांत आणण्यास परवानगी द्यावयाची हेंही ठरवील. या दोन्ही मर्यादा पाळूनच संघानें साखर-विक्रीचें काम करावयाचें. (२) संघाचा अध्यक्ष संघाच्या संचालकांनीं निवडावा; परंतु मुख्य कार्यकारी अधिकारी युक्त प्रांत व बिहार या दोन सरकारांकडून नेमण्यांत येईल. (३) साखरेसंबंधीच्या सर्व प्रश्नांवर सरकारी निर्णय घेण्यासाठीं व नियंत्रणाच्या अंमलबजावणीसाठीं सरकारामार्फत एक साखर–नियंत्रण–मंडळ नेमण्यांत येईल. या मंडळाचे अध्यक्ष व सभासद सरकारी नोकर असतील. ते संघाच्या संचालकमंडळाचे पदसिद्ध सभासद होतील. तथापि, संघास केव्हांहि दोन्ही प्रांतिक सरकारांकडे परस्पर दाद मागण्याचा अधिकार राहील. (४) सभासद असलेल्या प्रत्येक साखर-कारखान्यांत उत्पन्न होणाऱ्या साखरेची किंमत व त्याच्या एकंदर उत्पादनापैकीं वेळोवेळीं बाजारांत आणावयाचा भाग हीं संघानें ठरवावीं. तथापि, त्यास साखर-नियंत्रण-मंडळाची संमति असावी लागेल. (५) यासंबंधीची सर्व माहिती नियंत्रण मंडळानें प्रसिद्ध करीपर्यंत गुप्त ठेवण्यांत येईल. (६) नियंत्रण-मंडळास जरूर ती सर्व माहिती संघ पुरवील.

या नवीन व्यवस्थेप्रमाणें ऑगस्ट १९४० पासून






# साखरेची कडु कहाणी

एप्रिल १९४२ पर्यंत संघानें आपलें नियुक्त काम बिनबोभाट केलें. एप्रिल १९४२ मध्यें हिंदुस्थान-सरकारनें सर्व देशभर साखर व साखरेचे पदार्थ यांचें नियंत्रण जारी केलें. मध्यवर्ती सरकारनें एक साखर-नियंत्रक अधिकारी या कामावर नेमला व तो आपल्या दुय्यमांसह साखर-नियंत्रणाचें सर्व काम करूं लागला. त्यामुळें आंकडे गोळा करणें, संघाचें मासिक चालविणें व वेळोवेळीं आपल्या गाऱ्हाण्यांची दाद लावून घेण्यासाठीं सरकारकडे शिष्टमंडळें पाठविणें एवढींच कामें संघाकडे राहिलीं.

एप्रिल १९४२ पासून ८ डिसेंबर १९४७ पर्यंत साखरेवरील नियंत्रणें अस्तित्वांत होतीं व हिंदुस्थान-सरकारतर्फेच त्याची अंमलबजावणी होत होती. साखरेवरील सर्व नियंत्रणें उठविण्याचा निर्णय स्वतंत्र हिंदुस्थानच्या सरकारनें अधिकारावर आल्याबरोबर थोड्याच दिवसांत घेतला. नियंत्रणें उठल्याबरोबर ऑगस्ट १९४० मधील संयुक्त पत्रकात ठरल्याप्रमाणें युक्तप्रांत व बिहारमध्यें होणाऱ्या साखरेची विक्री करण्याचें काम संघाकडे क्रमानेंच आलें. १९४० च्या संयुक्त पत्रकांत उल्लेखिलेल्या कराराप्रमाणें युक्तप्रांत व बिहार यांनीं नेमलेल्या साखर-नियंत्रण-मंडळानें घालून दिलेल्या मर्यादांत राहूनच हें काम करावयाची संघावर जबाबदारी होती. संघानें या मर्यादा कशा झुगारून दिल्या व आपली शक्ति अयोग्य रीतीनें कशी वापरली यांतच स्वतंत्र हिंदुस्थानांतील साखरेची कडु कहाणी सामावलेली आहे.

वि-नियंत्रणानंतर साखरेची किंमत भरमसाट वाढली असती तर त्याचा ठपका सरकारवर आला असता. यासाठीं युक्तप्रांत, बिहार व हिंदुस्थान-सरकार यांचे व साखर-कारखानदारांच्या संघाचे प्रतिनिधी यांमध्यें वाटाघाट होऊन वि-नियंत्रणानंतर साखरेची किंमत दर मणीं रु. २२-१४-० पासून रु. ३५-७-० पर्यंत वाढवावी व संघानें साधारणपणें त्याच्यावर किंमती जाऊं देऊं नयेत असें ठरलें. ही नवीन किंमत नियंत्रित किंमतीपेक्षां ७० टक्क्यांनीं अधिक होती. ती ठरवितांना संघानें ऊंसखरेदीची किंमत दर मणीं रु. १-४-० पासून रु. २-०-० इतकी म्हणजे ६० टक्के वाढविण्याची सूचना केली. युक्त सरकारचा त्यास विरोध होता, परंतु आपण होऊन कारखानदार शेतकऱ्यांस जास्त भाव देण्यास तयार झाल्यावर त्यास विरोध करणेंहि अवघड झालें व युक्तप्रांत सरकारनें त्यास मान्यता दिली. अर्थात् यांत आंवळा देऊन कोहळा काढण्याचा संघाचा डाव होता. कारण संघानें त्याचबरोबर साखरेच्या दर मणास रु. २ जादा नफा व रु. ०-५-६ इतकी उत्पादनखर्चांत वाढ मिळण्याची मागणी केली. ही मागणी अत्यंत गैर होती, असें सर्व चौकशीअंतीं हिंदी जकात मंडळा ( Indian Tariff Board )नें साखर-धंद्यावरील आपल्या ताज्या अहवालांत नमूद केलें आहे व दरमणीं रु. ३५-७-० ही नवीन किंमत ठरवितांना युक्तप्रांत व बिहार सरकारांनीं आणि संघानें सामान्य जनतेच्या हिताकडे पुरेसें लक्ष दिलें नाहीं असा स्पष्ट शेरा मारला आहे.

१९४७-४८ च्या हंगामांत तयार होणाऱ्या साखरेस ही नवी किंमत लागूं झाली. तथापि संघासाखरेस ही नवी किंमत लागूं झाली. तथापि संघा-जवळ मागील हंगामांतील ८०,००० टन साखर शिल्लक होती. ती या वाढवलेल्या किंमतीसच विकून दरमणीं रु. १४-९-० जादा फायदा मिळवण्याचा संघानें घाट घातला. याची कुणकुण बाहेर लागली व त्याबद्दल बरीच आरडाओरड झाली. तेव्हां हिंदुस्थान-सरकारनें हा सांठा ७ डिसेंबर १९४७ रोजीं एक हुकूम काढून गोठविला. त्या साखरेची विक्री नवीन भावानें करतांना दर मणीं रु. ९-३-० सरकारला द्यावे व उरलेले रु. ५-६-० कारखानदारांनीं घ्यावे असें ठरवून दिलें. तरी सुद्धां कारखानदारांना एकंदर रु. १,२०,००,००० इतका फायदा मिळालाच व तोहि कोणतेहि कष्ट न करतां ! यासंबंधीं सर्वत्र पुष्कळ टीका झाली, तीस उत्तर देतांना संघातर्फे असें सांगण्यांत आलें कीं, या एकंदर फायद्यापैकीं बराच भाग प्राप्तीवरील कर व मजुरांना जादा बोनस देण्यांत खर्च झाला. त्यामुळें प्रत्यक्षांत कारखानदारांच्या पदरीं दर मणास रु. १-१४-० इतकाच फायदा पडला. हेंही मान्य केलें तरी साखर कारखान्यांना एकंदर रु. ४० लक्षांहून जास्त विनायास वट्ट फायदा झाला हें उघड आहे. हा सर्व पैसा

गरीब जनतेच्या खिशांतून साखर-कारखानदारांच्या खिशांत उतरला हें निराळें सांगावयास नकोच.

८ डिसेंबर १९४७ पासून नवीन भावानें साखरेची विक्री सुरू झाली. १९४७–४८ च्या हंगामांत साखरेचें उत्पादन १०,७७,००० टन झालें. त्याच्या मागच्या हंगामांत तें ९,०३,००० टन इतकेंच होतें. जादा उत्पादनामुळें साखरेचा पुरवठा वाढला. शिवाय पाकिस्तान झाल्यामुळें साखरेचा हिंदुस्थानांतील खप जवळजवळ २½ लक्ष टनांनीं कमी झाला. जादा उत्पादन व घटलेला खप यांमुळें साखरेचा सुकाळ झाला तर कदाचित् किंमती घसरतील, या भीतीनें कांहीं साखर हिंदुस्थानांतून निर्यात करण्याचें संघानें ठरविलें. अर्थात् मणास रु. ३५–७–० ही किंमत फार असल्यामुळें त्या किंमतीस परदेशांत साखर खपणें शक्य नव्हतें. यासाठीं हिंदुस्थानांतील किंमतीपेक्षां कमी किंमतीस साखर निर्यात करणें संघास भागच आलें. मुंबईच्या साखर व्यापाऱ्यांनीं २ ऑगस्ट १९४८ रोजीं जें पत्रक काढलें त्यांत संघानें थोड्या दिवसांपूर्वीं ५००० टन साखर प्रत्येक पोत्यामागें रु. ५ कमी घेऊन पाकिस्तानास विकली व आणखी ५०,००० टन साखर अशाच कमी किंमतीनें विकण्यासंबंधीं संघाच्या वाटाघाटी चालू आहेत असें जाहीर केलें व त्याचा निषेध केला. या पत्रकास संघातर्फे जें अधिकृत उत्तर देण्यांत आलें, तें सर्वच दृष्टींनीं वाचनीय आहे. म्हणून त्यांतील महत्त्वाचा भाग येथें थोड्या विस्तारानें देतों.

" सामान्य हिंदी जनतेचा तोटा करून संघानें पाकिस्तानास अंतर्गत भावापेक्षां कमी भावांत साखर विकली, असा साखर–व्यापाऱ्यांच्या पत्रकांत संघावर आरोप करण्यांत आला आहे. विनियंत्रणानंतर साखरेची किंमत योग्य पातळीवर स्थिर ठेवण्याची जबाबदारी संघावर पडलेली आहे. उत्पादन वाढवून व साखर सर्वत्र योग्य प्रमाणांत पुरवून ही जबाबदारी संघानें पार पाडली आहे. तथापि, पाकिस्तान–निर्मितीमुळें एकंदर साखरेचा खप २½ लक्ष टनांनीं घटला आहे. त्यामुळें होणारा तोटाहि संघासच सोसावा लागणार आहे. विनियंत्रणानंतर हिंदुस्थानांतील साखरेचा खप १ लक्ष टनांनीं वाढला; त्यामुळें पाकिस्तानांतील साखरेची बाजारपेठ गेल्यामुळें होणारा तोटा थोडाफार भरून निघाला आहे. तथापि, या हंगामांतील १½ लक्ष टन साखर शिल्लक राहील असा अंदाज आहे. त्यामुळें युक्त प्रांत व बिहारमधील साखर-कारखान्यांना इथल्यापेक्षां कमी भावानें, नुकसान सोसून सुद्धां, पाकिस्तानला साखर विकणें भाग आहे. "

—टाइम्स ऑफ इंडिया, १८ ऑगस्ट १९४८.

वरील पत्रकाचा अर्थ सरळ आहे. नुकसान सोसून सुद्धां पाकिस्तानास कमी किंमतीनें साखर विकावयास संघ तयार होता; परंतु हिंदुस्थानांत मात्र कमी किंमतीनें साखर विकण्याची त्याची तयारी नव्हती, हें यावरून उघड दिसतें. साखरेची किंमत रु. ३५–७–० पेक्षां कमी केली असती तर हिंदुस्थानांत साखरेचा खप अधिक वाढला असता व १½ लक्ष टन साखर शिल्लक राहण्याचा प्रश्न पुष्कळ अंशीं सुटला असता. परंतु सर्वच साखरेची किंमत कमी झाली असती व त्या प्रमाणांत संघांतील साखर-कारखान्यांच्या अनन्वित फायद्यांत कपात झाली असती ! हें होऊं नये म्हणून संघानें पाकिस्तानास कमी भावानें साखर विकण्याचा उपक्रम केला. यावरून त्याची दानत, स्वदेशाभिमान, तत्त्वज्ञान हीं काय दर्जाचीं व प्रकारचीं होतीं व आहेत. याचा उलगडा होतो.

१९४७–४८ चा साखरेचा हंगाम ऑक्टोबर १९४८ मध्यें संपला. १९४० मध्यें साखर-कारखानदारांच्या संघास पुन्हां सरकारी मान्यता देतांना त्यानें संयुक्तप्रांत व बिहार सरकारांनीं नेमलेल्या साखर-नियंत्रण-मंडळानें ठरवून दिलेल्या मर्यादांत राहूनच साखरेची विक्री करावयाची असा करार झाला होता हें वर सांगितलेंच आहे. विनियंत्रणानंतर जरी मध्यवर्ती सरकारचें नियंत्रण उठलें, तरी युक्त आणि बिहार प्रांतिक सरकारांनीं नेमलेल्या साखर-नियंत्रण-मंडळाच्या संघावरील नियंत्रणास बाध येण्याचें कारण नव्हतें. कानपूरच्या साखर-संशोधन-संस्थेच्या संचालकानें ९ फेब्रुवारी १९४८ रोजीं साखर-नियंत्रण-मंडळास पत्र लिहून १९४० च्या पत्रकाप्रमाणें संघाच्या कार्यावर








धाडलें व त्यांत " साखरेच्या पुरवठ्याचे
भाग बाजारांत नेण्यासाठीं ' मोकळे ' करतांना
संघास फार तांतडीनें निर्णय करावा लागत असल्या-
मुळें त्याची माहिती आगाऊ कळवितां येणार नाहीं "
असें कळविलें. त्यावर २७ जानेवारीस साखर-
नियंत्रकानें पत्र पाठवून आक्षेप घेतला व १९४०
च्या संयुक्त पत्रकान्वयें या बाबतींतील संघावर
पडणाऱ्या जबाबदारीची त्यास जाणीव करून दिली.
त्याला ७ फेब्रुवारी रोजीं संघाच्या अध्यक्षांनीं उत्तर
धाडून वरील संयुक्त पत्रकाची आपणास माहिती
नाहीं असें कळविलें व इतर नाना बयादी काढून
कालहरणाचा डाव मांडला. बरीच पत्रापत्री झाल्यावर
८ मार्च रोजींच्या पत्रांत संघाच्या अध्यक्षांनीं अशी
सूचना केली कीं, कारखान्यांच्या उत्पादनापैकीं
किती भाग बाजारांत नेण्यासाठीं ' मोकळा '
करावयाचा, हें संघ ठरवील व त्यास साखर-नियं-
त्रकानें नंतर औपचरिक मान्यता द्यावी. या सर्व
पत्रव्यवहाराच्या प्रती वेळोवेळीं युक्तप्रांत-सरकारकडे
धाडण्यांत येत होत्या. शेवटीं १२ मे १९४९ रोजीं
युक्तप्रांत-सरकारनें संघास पत्र लिहून १९४० च्या
संयुक्त पत्रकांतील सर्व अटी संघानें पाळल्या पाहि-
जेत व तसें न केल्यास संघाची कायदेशीर मान्यता
सरकारला काढून घ्यावी लागेल अशी सक्त ताकीद
दिली. तथापि, संघानें तीस जुमानलें नाहीं. १२ मे
पर्यंत साखर-कारखान्यांच्या उत्पादनापैकीं ५० टक्के
साखर बाजारात नेण्यासाठीं संघानें ' मोकळी '
केली होती. युक्तप्रांत-सरकारनें वरीलप्रमाणें ताकीद
दिल्यावरहि संघानें १४ मे ला १० टक्के, १७ जूनला
१० टक्के व २८ जूनला आणखी १० टक्के साखर
साखर-नियंत्रण-मंडळाच्या परवानगीशिवाय 'मोकळी'
केली. म्हणजे एकंदर उत्पादनापैकीं ८० टक्के
साखरेची अशी विल्हेवाट लागली ! २० जुलै रोजीं
वर उल्लेखिलेल्या कृत्यांना साखर-नियंत्रण-मंडळानें
औपचारिक संमति द्यावी असें संघानें सुचविलें.
लगेच २२ जुलैला संघाच्या चिटणिसानें साखर-
नियंत्रकाकडे " कारखान्यांकडे उरलेली २९ टक्के
साखर बाजारांत नेण्यासाठीं ' मोकळी ' करण्यास
आगाऊ मान्यता द्यावी " अशी मागणी केली.
त्याच वेळीं संघाच्या अध्यक्षांनीं युक्तप्रांत-सरकारच्या
औद्योगिक खात्याच्या चिटणिसाची गांठ घेऊन
उरलेली २० टक्के साखर ' मोकळी ' करण्याची
परवानगी त्याच्याकडून मिळविली. व त्याप्रमाणें साखर-
नियंत्रकास कळविलें तथापि, उरलेल्या २० टक्के साखरें-
तून पुढच्या हंगामापर्यंत सर्व जनतेस साखर मिळ-
ण्याची संघानें काय व्यवस्था केली आहे ती
आपल्यापुढें आल्याखेरीज उरलेली २० टक्के साखर
' मोकळी ' करण्याचें साखर-नियंत्रकानें नाकारलें.
यानंतर त्याच्यावर संघाकडून युक्तप्रांत-सरकारनें
दिलेल्या परवानगीच्या आधारावर बरेंच दडपण
आणण्यांत आलें. त्यामुळें २९ जुलै १९४९ रोजीं
उरलेल्यापैकीं निम्मी म्हणजे १० टक्के साखर मोकळी
करण्यास त्यानें परवानगी दिली. १९ ऑगस्टला
आणखी ५ टक्के साखर मोकळी करण्याबद्दल संघानें
साखर-नियंत्रकास तारेनें विनंति केली. ती त्यानें
अमान्य केली. २३ ऑगस्ट रोजीं संघाच्या अध्यक्षांनीं
त्यास पुन्हा तार करून उरलेली सर्व साखर
' मोकळी ' करण्याची विनंति केली. तीहि
धुडकावण्यांत आली. यानंतर लवकरच साखरेवर
पुन्हां नियंत्रण बसविण्यांत आलें.

वरील तपशीलवार हकीगतीवरून सरकारी नियंत्रण
झुगारून देऊन आपली तुंबडी भरण्याचा उद्योग
संघानें कसा पद्धतशीर रीतीनें केला हें उघड होईल.
तथापि, एवढ्यानेंच भागलें नाहीं. आणखी किती
तरी गैरकायदा गोष्टी संघानें केल्या होत्या. २६
ऑगस्ट १९४९ रोजीं युक्तप्रांत-सरकारनें सर्व
साखरेचे सांठे गोटाविले. त्यानंतर सुद्धां पुष्कळ कार-
खान्यांनीं साखरेची विक्री केली असें नंतर आढळून
आलें. त्याचप्रमाणें साखरेची किंमत दरमणीं
रु. २८–८–० ठरली होती. ती साखर-नियंत्रण-
मंडळाच्या परवानगीशिवाय संघानें प्रथम पासूनच
रु. २८–१२–० इतकी वाढवली. साखरेची कमी
दरानें हिंदुस्थानबाहेर निर्यात करण्यामुळें जो तोटा
होईल तो भरून काढण्याच्या हेतूनें संघानें दरमणास
४ आणे या दरानें एक फंड जमा करण्यासाठीं ही
किंमत वाढविण्यांत आली होती, असें संघाच्या प्रति-
निधींनीं हिंदी जकात-मंडळानें केलेल्या चौकशीच्या
वेळीं सांगितलें.

संघानें आपल्यावरील नियंत्रणें झुगारून देण्या-






साठीं कोणत्या कारवाया केल्या, याची ही हकीगत झाली. आतां प्रत्यक्ष व्यवहारांत साखरेचें दुर्भिक्ष कसें निर्माण झाले याकडे वळलें पाहिजे. १९४८-४९ च्या हंगामांत मागील हंगामापेक्षां जवळजवळ ३½ लक्ष टन जास्त साखर उपलब्ध होती याचा वर उल्लेख केलाच आहे. असें असून सुद्धां साखर दुर्मिळ कां झाली ?

१९४८-४९ च्या हंगामांत साखर बाजारांत नेण्यासाठीं 'मोकळी' करण्यांत संघानें आपला हात फार ढिला सोडला होता. १९४७-४८ च्या हंगामाच्या सुरुवातीपासून २१ जून १९४८ पर्यंत संघानें १,७४,००० टन साखर 'मोकळी' केली होती. परंतु १९४८-४९ च्या हंगामाच्या सुरवातीपासून १८ जून १९४९ पर्यंत संघानें ७,७५,००० टन साखर 'मोकळी' केली ! म्हणजे मागल्या हंगामाच्या मानानें त्याच मुदतींत चौपटीहून अधिक साखर संघानें 'मोकळी' केली. बाजारांतील वाढत्या खपामुळें इतकी साखर 'मोकळी' करावी लागली, असें त्याचें संघानें समर्थन केलें आहे. परंतु वास्तविक प्रकार निराळा दिसतो. जून १९४९ पर्यंत हंगामाच्या एकंदर उत्पादनापैकीं ८० टक्के साखर संघानें 'मोकळी' केली होती याचा वर उल्लेख केलाच आहे. हिंदी जकात-मंडळानें केलेल्या चौकशीच्या वेळीं संघाच्या अध्यक्षांनीं सांगितलें कीं, एप्रिल, मे व जून (१९४९) या महिन्यांत साखरेस कमी मागणी असल्यामुळें ठरलेल्या दरा-( म्हणजे मणास रु. २८-८-० )पेक्षां सुद्धां कमी भावानें कांहीं वेळां साखर विकली जात होती. या विधानाचा आणि वाढत्या मागणीमुळें पुष्कळ साखर 'मोकळी' करावी लागली या समर्थनाचा मेळ कसा घालावयाचा ? इतर पुराव्यावरून मागणी फार नव्हती, नेहमींप्रमाणेंच होती, असें दिसतें. हा पुरावा नीट समजण्याच्या दृष्टीनें साखर "मोकळी" करण्याच्या पद्धतीचा अर्थ प्रथम विशद केला पाहिजे. कारखान्यांत तयार झालेल्या साखरेपैकीं किती भाग बाजारांत नेण्यासाठीं "मोकळा" करावयाचा हें ठरवावयाचा संघास अधिकार होता. संघानें भाग "मोकळा" करावयाचा याचा अर्थ तितकी साखर कारखान्यांना विकण्यास परवानगी द्यावयाची. अशी परवानगी मिळेपर्यंत कारखान्यांना साखर विकण्याची परवानगी नव्हती. संघानें उत्पादनाचा विशिष्ट भाग "मोकळा" केला म्हणजेच तो भाग कारखान्यांना विकण्याची मुभा दिली; म्हणजे त्यापैकीं प्रत्यक्ष किती साखर विकावी वगैरे बाबतींत कारखान्यांस संपूर्ण स्वातंत्र्य मिळे. अर्थात् संघानें ठरविलेल्या किंमतीस ती विकण्याचें त्यांजवर बंधन असे ( अर्थात् तें संघानें घातलें तर ! ). साखरेस वाढती मागणी असती, तर संघानें साखर "मोकळी" केल्याबरोबर कारखान्यांनीं ती बाजारांत रवाना केली असती व ती विकली गेली असती; परंतु तसें झालेलें दिसत नाहीं. मार्चअखेर ५० टक्के व जूनअखेर ८० टक्के साखर संघानें "मोकळी" करून सुद्धां त्या मुदतींत अनुक्रमें २२ टक्के व ५५ टक्के साखरच बाजारांत रवाना झालेली होती. यावरून प्रमाणाबाहेर साखर मोकळी करण्यामागें संघाचा दुसराच हेतु असावा हें स्पष्ट दिसतें. साखरेचें दुर्भिक्ष निर्माण करून किंमती वाढविणें हाच तो हेतु. गरजेपेक्षां जास्त "साखर" मोकळी करण्यांत हा हेतु होता, असें म्हणणें कदाचित् 'वदतो व्याघाता'चें उदाहरण वाटण्याचा संभव आहे. परंतु तें तसें नाहीं. कारखान्यांत असलेली साखर संघानें मोकळी केलेली नसेल तर ती किती आहे, कोठें आहे, कोणत्या प्रतीची आहे याची माहिती संघाकडे असावी लागे. तसाच प्रसंग आला तर सरकारला ती तशा परिस्थितींत ताब्यांत घेणें सोपें व सोईचें असतें. परंतु एकदां ती "मोकळी" केली कीं तिची माहिती फक्त कारखानदारालाच ! तो आपल्या मर्जीप्रमाणें तिची विक्री करणार, अगर सांठा करणार. त्याच्यावर कांहींच बंधन नव्हतें व त्यानें प्रत्यक्षांत साखर विकली कीं सांठविली, किती विकली, हें समजण्यास मार्ग नव्हता. थोडक्यांत, 'मोकळी' झालेली साखर वेळप्रसंगीं सरकारला मिळणें अगर ताब्यांत येणें अशक्य. संघानें गरजेपेक्षां पुष्कळच जास्त साखर 'मोकळी' करून साखर-कारखानदारांना भरपूर सांठे करून ठेवण्यास सवड व आंतून उत्तेजनहि दिलें.

तथापि, येवढ्यानें संघाचा कार्यभाग पूर्णपणें साधला नसता. यासाठीं साखर दुर्मिळ होणार आहे अशा





अनुक्रमणिका

डॉ. य. कृ. सोवनी

# ग्रामीण शिक्षण व ग्रामीण विद्यापीठें

नवोदित[1] भारतीय लोकसत्ताकाच्या आकांक्षा व गरजा भागविण्याच्या दृष्टीनें भारतांत नवीन तऱ्हेच्या शिक्षण-संस्था काढण्यास खूप अवसर आहे. विद्यमान शिक्षण-संस्थांत थोडे फेरफार करून अगर कांहीं सुधारणा करून ही गोष्ट साध्य होणार नाहीं. तर स्वतंत्र वातावरणांत आणि एका नवीन दृष्टिकोणानें व जगामध्यें शिक्षणक्षेत्रांत आज जे नवीन विचार व व्यवहार प्रस्तुत झाले आहेत त्यांचाहि योग्य परामर्श घेऊन या नवीन शिक्षण-संस्थांची आपण उभारणी केली पाहिजे. हें करतांना भारतांतील शें. ८५ लोक खेड्यांत राहणारे आहेत ही मुख्य गोष्ट लक्षांत घेणें जरूर आहे. खेड्यांत पसरलेल्या या अफाट लोकसंख्येंतील फारच थोड्या लोकांना आजपर्यंत दुय्यम अगर उच्च शिक्षणाचा संपर्क लागला आहे; आणि ज्या थोड्यांना लागला आहे, ते खेड्यापासून कायमचे दूरावले आहेत. भारतीय ग्रामीण जनतेच्या आर्थिक दुर्दशेचें आणि सांस्कृतिक अवकळेचें येथें वर्णन करण्याची जरूरी नाहीं. तें सर्वश्रुत आहे. या अफाट ग्रामीण जनतेस आपल्या भौतिक व सांस्कृतिक विकासास पूर्ण अवसर मिळेल अशा रीतीनें नवीन शिक्षण-संस्थांची उभारणी होणें जरूर आहे.

अशा ग्रामीण ( जानपद ) विद्यापीठांचा विद्यमान विद्यापीठांशीं कोणत्याहि रीतीनें संघर्ष उत्पन्न होणार नाहीं. वैद्यकीय शिक्षण व स्थापत्य-शिक्षण यामध्यें जसा कधीं संघर्ष निर्माण होत नाहीं तशीच ही गोष्ट आहे. विद्यमान विद्यापीठांची रचना व शिक्षणाचें धोरण पूर्णपणें शहरी ( नागर ) आहे ही गोष्ट उघड आहे. ग्रामीण जीवनांत चेतना निर्माण करून तें समृद्ध व संस्कृत बनविण्याच्या उद्देशानें निघणाऱ्या नवीन ग्रामीण विद्यापीठांवर व शिक्षण-संस्थांवर विद्यमान विद्यापीठांच्या शहरी वृत्तीचा व धोरणाचा प्रभाव पडूं नये अशा दृष्टीनें त्यांना आपल्या शिक्षणक्रमाची आंखणी स्वतंत्र रीतीनें करतां आली पाहिजे. विद्यमान विद्यापीठांतील व या नवीन तऱ्हेच्या विद्यापीठांतील कांहीं शिक्षणविषयक बाबी अगर पद्धती यांमध्यें साम्यहि आढळून येईल. आणि त्यामुळें दोन्हींमध्यें परस्परसहकार्यहि होत राहील. किंबहुना या नवीन ग्रामीण विद्यापीठांना विद्यमान विद्या-

---

१ डॉ. राधाकृष्णन् यांच्या अध्यक्षतेखालीं भारतीय सरकारनें नेमलेल्या युनिव्हर्सिटी एज्युकेशन कमिशनचा ' रिपोर्ट ' अलीकडे प्रसिद्ध झाला. त्या ' रिपोर्ट 'मध्यें ज्या अनेक वैशिष्ट्यपूर्ण शिफारशी केलेल्या आहेत त्यांत ग्रामीण विद्यापीठांबाबतच्या शिफारशींची प्रामुख्यानें गणना करावी लागेल. प्रस्तुत लेख हा त्या ' रिपोर्ट 'मधील ' ग्रामीण विद्यापीठें ( Rural Universities ) ' या १८ व्या प्रकरणाचा संक्षिप्त सारांश आहे. ग्रामीण विद्यापीठांबाबत शिफारस करतांना राधाकृष्णन्-समितीवर ज्या प्रत्यक्ष शैक्षणिक प्रयोगाचा विशेष प्रभाव पडलेला दिसतो तो म्हणजे डेन्मार्कमधील ' लोकमहाविद्यालयां ( People's Colleges ) 'चा होय. डेन्मार्कमधील या लोकमहाविद्यालयांविषयींची संक्षिप्त माहिती त्या रिपोर्टाच्या आधारेंच या लेखाच्या शेवटीं पुरवणी म्हणून जोडली आहे.









अनुक्रमणिका

मेहनत यांची आवड असणारा, अत्यंत निर्भयपणें पण शान्त स्नेहमयतेनें सत्य तेंच बोलणारा, समाजाभिमुख असूनहि एकान्तप्रिय, आपल्या बुद्धिचातुर्यानें व सात्त्विकतेनें लोकांचीं मनें उन्नत करणारा, ' अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च '—असा धीरोदात्त, करुणगंभीर, मानव्यपूर्ण बोधिसत्त्व आपणांसमोर उभा राहतो. यशोधरेचें व्यक्तिमत्त्वहि मोठें उमदें व विलोभनीय वाटतें. आपल्या समवयस्क पतीचा थोरपणा समजणारी, त्याच्या ध्येयाशीं समरसून जाणारी, लग्न झाल्यानंतर वयाला २५ वर्षे पूर्ण होईपर्यंत ब्रह्मचर्य पाळण्याच्या पतीच्या इच्छेला मनोभावें अनुमति देणारी, प्रवज्येला जाणाऱ्या पतीला आनंदानें अनुमोदन देणारी, स्वाभिमानी आणि तेजस्वी अशी यशोधरा कोसंबी यांनीं चित्रित केलेली आहे.

धर्मानंद कोसंबी बौद्ध वाङ्मयांत मुरलेले रसज्ञ पंडित. आरंभीं प्रस्तावनेंतच त्यांनीं बोधिसत्त्वाच्या चरित्राला आधारभूत असे त्रिपिटकांतील उतारे दिले आहेत. आपल्या रसिक दृष्टीनें बौद्ध वाङ्मयांतून त्यांनीं नाटकांकरितां निवडलेल्या घटना, प्रसंग, व्यक्ती व त्यांचीं नांवें, विचार, भावना व स्वभावचित्रण—हीं त्या काळच्या वातावरणाशीं इतकीं समरस व अनुरूप आहेत कीं, वाचकाला आपण त्या काळांतच आहों याचा, ' तदानींतन ' झाल्याचा अनुभव येतो.

—वि. म. बेडेकर

## आमची माती...आमचें आकाश

**—अनंत काणेकर. चित्रें : दीनानाथ दलाल**

[ मौज प्रकाशनः १ : गिरगांव ( मुंबई ४ ). जून १९५०. पानें २२६. किं. रु. ४॥ ]

आपल्या नित्याच्या व्यवसायाच्या ठराविक चाकोरींतून जात असतांना माणसाचें मन त्याच त्याच अनुभवांनीं शिळें बनत जातें, जीवनांतील ठराविक अनुभवांच्या चार भिंतींच्या आड राहून माणसाच्या आत्म्याला गुदमरल्यासारखें होतें. नेहमीं ' तेंच आकाश, आणि तीच माती ' बघून हृदयांतली कौतुकभावना मृतप्राय होऊं लागते. हा ठराविकपणा घालवून जीवनांत पुन्हां टवटवी, उत्साह उत्पन्न करायचा असेल, तर त्याला प्रवास हें एक प्रभावी साधन आहे. हा प्रवास करतांना आर्थिक अनुकूलतेबरोबरच, स्वभावानुकूल संवगडी, सौंदर्यान्वेषी, सदभिरुचिसंपन्न मन, विवेचक, शास्त्रपरिपूत बुद्धि, सहानुभूतिपर वृत्ति—या ' पाथेया'ची जोड असेल तर एका प्राचीन वचनांत म्हटल्याप्रमाणें ( ' पुष्पिण्यौ चरतो जंघे भूष्णुरात्मा फलग्रहिः । शेरेऽस्य सर्वे पाप्मानः श्रमेण प्रपथे हताः ॥') खऱ्या प्रवाश्याचें शरीर गोड श्रमानें प्रफुल्ल होतें आणि त्याच्या मनांतील संकुचितता, शिळेपणा नाहिंसा होऊन तें नवीन अनुभवांनीं बहरून ताजेंतवानें होतें.

अशाच निकोप आनंदाची लकेर आपणांस ' आमची माती...आमचें आकाश ' या पुस्तकाच्या द्वारें अनुभवावयास मिळते. श्री. अनंत काणेकर आणि दीनानाथ दलाल हे अहमदाबाद, अबू, उदेपूर, जयपूर, आग्रा, हरिद्वार, दिल्ली, अमृतसर, बनारस, गया, बुद्धगया, कलकत्ता इत्यादि ठिकाणीं ११ मार्च ते २७ एप्रिल—दीड महिना प्रवास करून आले. ही सगळी आमची भारतीयच माती व भारतीयच आकाश. पण त्यांत किती वेगवेगळी खुमारी आहे, याची त्यांनीं रेखाटलेल्या विविध दृश्यांवरून आणि वैयक्तिक व सामाजिक चित्रांवरून कल्पना येते. शब्दचित्रकार आणि रेखाचित्रकार यांच्या कलांचा सुरेख संगम हें ह्या पुस्तकाचें वैशिष्ट्य आहे. काणेकरांनीं आपल्या रसिक लेखणीनें रेखाटलेल्या शब्दचित्रांच्या साहाय्यानें वाचकाच्या कल्पनाचक्षूंसमोर जीं दृश्यें झरझर सरकत जातात त्यांपैकीं कांहीं दलालांच्या कुंचल्यांतून प्रत्यक्ष कागदावर अवतरलेलीं बघून वाचकाला एक प्रकारचें अपेक्षापूर्तीचें समाधान लाभतें.

" टांगेवाल्यांनीं सांगितलेले समाजशास्त्राचे सिद्धान्त आणि हमालांनीं दिलेलं इतिहासाचं ज्ञान आम्हांला फारच मनोरंजक वाटलं " असें काणेकरांनीं आपल्या छोट्या शैलीपूर्ण प्रस्तावनेंत म्हटलें आहे. या विधानामागें असलेली खेळकर भावना, निराग्रही वृत्ति आणि वेगवेगळी माती व वेगवेगळें आकाश पहावयाची उत्सुकता हीं सर्व पुस्तकांत अनुस्यूत झालेलीं दिसून येतात.










आहेत. अर्थातच 'बलिष्ठ राष्ट्रांनीं लहान राष्ट्रांची क्षुद्र मनोवृत्ति दाखविली नाहीं' तरच हें शक्य आहे.

"कांहीं थोडे सुदैवी देश सोडल्यास अन्न-विषयक प्रश्नानें सर्वच जगाला ग्रासून टाकलें आहे. म्हणून सबंध जगानेंच त्याच्या सोडवणुकीसाठीं एक-जुटीनें प्रयत्न करावयास पाहिजे. जागतिक सहकार या बाबतींत अत्यावश्यक आहे.

"यासाठीं विज्ञानानें संपूर्ण सहकार्य केलें पाहिजे. युद्धाच्या काळांत विनाशक साधनें निर्माण करण्या-साठीं जर शास्त्रज्ञ अखंड श्रम करतात तर मानवजाती-च्या संरक्षणासाठींहि त्यांनीं तसे केले पाहिजेत. धान्या-च्या नवनवीन संकरजन्य जाती, कृत्रिम खतें, ढोरांची निपज व त्यांची संकरजन्य नवीन वाढ, याबाबतचे एकाच मध्यवर्ती संघटनेच्या विद्यमानें प्रयोग झाले पाहिजेत. त्यांनीं राष्ट्रीय, वांशिक किंवा राजकीय कसलेच भेद आड येऊं देतां कामा नयेत.

"याशिवाय आंतरराष्ट्रीय भूमिकेवरून योजना आंखून त्याप्रमाणें जमिनीची नैसर्गिक झीज (erosion) थांबविणें, वाळवंटांतून जमीन परत लागवडीस आणणें, जमीन सुपीक करण्याचीं साधनें (फर्टिलायझर्स) स्वस्त तयार करणें, सांडपाण्याची व्यवस्था व पाटबंधाऱ्यांची योजना सुव्यवस्थितपणें करणें, इत्यादि गोष्टी अंमलांत आणल्या गेल्या पाहिजेत. आतांपर्यंत माणसानें सृष्टीपासून सगळें रक्त शोषून घेतलें. आतां तिला कांहीं तरी शक्तिवर्धक पोषक द्रव्यें दिल्याबांचून ती आपणाला हात देणार नाहीं.

"अन्न-वस्त्राप्रमाणेंच घरांची गरजहि माणसाला मूलभूतच असते. आज घराचा प्रश्न मोठा बिकट झालेला आहे. चीनमध्यें कांहीं नाहीं तरी एक कोटी घरें पाहिजे आहेत. ब्रह्मदेशांत युद्धानें नष्ट झालेलीं सुमारें २३० हजार घरें पुनः बांधावीं लागणार आहेत. फिलिपाइन्स्मध्येंहि युद्धामुळें २७० हजार घरें नष्ट झालेलीं आहेत. युरोपमध्यें १४ दशलक्ष घरें कमींत कमी पाहिजेत. केवळ अखिलजागतिक स्वरूपाच्या योजनेनेंच ही फार निकडीची गरज भागणें शक्य आहे.

"युरोपांत फ्रान्समध्यें व बेल्जममध्यें जननप्रमाण पूर्वीच्या मानानें कमी झालेलें दिसतें तें संतति-नियमनाच्या साधनांमुळें असें म्हणतात. परंतु एकंदरींत जगाची लोकसंख्या निश्चित वाढत आहे व त्या वाढीचें प्रमाण चिंताजनक आहे. दररोज स्थूल-मानानें ५५,००० मुलें जन्मतात. जरूर ती निगा व अन्न न लाभल्यामुळें त्यांतील एक-चतुर्थांश मुलें एका वर्षाच्या आंतच मरून जातात. जीवनाचा हा केवढा अपव्यय! जुनीं ध्येयें व कल्पना सोडून अन्न-वस्त्र-गृहांनीं समृद्ध अशा लहान लहान वसाहती आतां अस्तित्वांत आणणें योग्य होईल.

"पण सर्वांत जास्त महत्त्वाचें हें आहे कीं माणसानें आपलें जीवन साधेंसुधें केलें पाहिजे. जास्त उच्च राहणी म्हणजे निसर्गसंपत्तीवर अधिकाधिक ताण. त्यापेक्षां अधिक साधेंच जीवन कां न कंठावें?... शिवाय जीवनराहणीच्या उच्च मानाची कल्पनाहि भ्रामक असते; बदलत असते. आपल्या सुख-सोयींसाठीं निसर्गाच्या संपत्तीची उधळपट्टी करण्या-पेक्षां आपल्या पुढील पिढ्यांच्या कल्याणाचीच कांहीं काळजी घेणें बरें.

"तेव्हां जनसंख्येची समप्रमाणांत विभागणी, अन्नसमृद्धि वाढविण्यासाठीं व लागवडींतील उधळपट्टी थांबविण्यासाठीं आंतरराष्ट्रीय सहकार्य, आणि राहणीचें साधें मान यांमुळेंच प्रमाणातीत लोकसंख्येचा भीषण प्रश्न सोडवितां येईल."

## रोगजंतूंचा युद्धसाधन म्हणून उपयोग

युरोपीय प्रश्नांचा अभ्यास करण्यासाठीं नेमलेल्या अँग्लो-फ्रेंच समितीनें अगदीं भावनाशून्य, निर्लेप वृत्तीनें अशी शिफारस केली आहे कीं, पश्चिमेकडील राष्ट्रांनीं आतां रोगजंतुमय युद्धासाठीं तयारी करावी. त्यामुळें तिनें पुढचें तिसरें महायुद्ध किती भयानक होईल याचें पुन्हां स्मरण करून दिलें आहे. या कमिटीवरील अनेक सदस्य मोठमोठे प्रसिद्ध लोक आहेत, आणि विस्मयाची गोष्ट ही कीं यूनोच्या मानवी हक्कांसंबंधींच्या कमिशनचे उपाध्यक्ष मॉ. रेने केझिन् (M. Rene Cassin) हे स्वतःच त्या कमिटीवर होते. इतक्या प्रसिद्ध माणसांना, भयानक भौतिक अस्त्रांच्या मानानें, ही जंतुशास्त्रीय अस्त्रांची निर्मिति कमी भयानक वाटते असाच याचा अर्थ नव्हे काय?



अनुक्रमणिका

या जंतुशास्त्रीय युद्धाचें स्वरूप काय व त्याबाबत नीति-अनीतीचा प्रश्न कितपत उद्भवतो, याविषयीं एक उद्बोधक लेख "सन्डे न्यूज् ऑफ् इंडिया"च्या १६ जुलैच्या अंकांत "R. G. G." या सहीनें आलेला आहे. त्याचा सारांश असा :

"सर्वसाधारण नागरिकाचें मत काय आहे त्याकडे दुर्लक्ष करून सर्व पुढारलेल्या राष्ट्रांत या जंतुशास्त्रीय युद्धतंत्राचें संशोधन चालू आहे. जीव-शास्त्रीय-( ज्याचा जंतुशास्त्र एक भाग आहे )-युद्ध-साधनें प्रत्यक्ष वापरलीं जावोत वा न जावोत, पण तीं अत्यंत प्रबल अशीं सुप्त व संभाव्य शक्तीचीं अस्त्रें म्हणून स्वीकारलीं गेलीं आहेतच. तीं साधनें बेकायदा ठरवावीं म्हणून चाललेले सर्व प्रयत्न निष्फळ ठरले आहेत. फक्त एकमेकांबद्दलच्या भीतीचा अलिखित कायदाच काय तो या रोगजंतु-मय भीषण युद्धाला आळा घालूं शकणार आहे. राजकारणी लोकांना एवढें कळतें कीं, युद्धात प्रति-पक्षहि, आपण जें करूं, तें करणारच. या विचारामुळेंच गेल्या दुसऱ्या महायुद्धांत विषारी वायूचा उपयोग केला गेला नाहीं.

"या परस्परविषयक भीतीबरोबरच तीं जंतुमय अस्त्रेंच स्वतःवर उलटण्याची भीतिहि त्यांची भयान-कता वाढविते; कारण जंतूंना कांहीं देशांच्या मर्यादा कळत नाहींत कीं त्यांच्या मनांत आपपरभाव नाहीं !

"प्रतिबंधक उपायांचा सर्रास अवलंब केला आणि जरी शत्रुराष्ट्र शरण आलें तरी त्याचा ताबा घेणें आणि त्यांतून आपली नुकसानभरपाई करून घेणें फारच कठीण आहे. एखाद्या महारोगी बेटाचा ताबा घेऊन त्याची लूट करावी ही कल्पना फारच थोड्या राजकारणी मुत्सद्द्यांना रुचेल. ताबा घेणाऱ्या सैन्यासाठीं, पाण्याच्या दरेक थेंबांत आणि भाकरीच्या दरेक तुकड्यांत विषारी जंतु, रोग आणि मृत्यु यांची तयारी करीत असतील ! प्रतिबंधक लस टोंचलेले सैनिक पाठवूं अशी कल्पना सामान्य माणसाच्या डोक्यांत असणें शक्य आहे. पण तज्ज्ञ वैज्ञानिकाची माहिती निराळीच असते. शंभर टक्के यशस्वी प्रतिबंधक लसी फारच थोड्या जंतूंबाबत उपलब्ध आहेत. बाकींच्या लसी कांहीं प्रमाणांत उपयोगी असतात व कांहीं तर अगदीं व्यर्थ जातात. आणि इतकें करूनहि ही लस टोंचली तरी थोड्या प्रमाणांत रोगाचे आवेग यावयाचे ते येतातच.

"असें असूनहि हें रोगजंतुमय युद्ध म्हणजे केवळ स्वप्नांत भेडसावणारी गोष्ट न राहतां तें अगदीं आजहि कोणत्याहि मोठ्या शहरावर कोसळण्याचा संभव तीन कारणांमुळें फार वाटतो : ( १ ) कांहीं थोड्याच शहरांवर या जंतूंचा हल्ला झाल्यावर सबंध देशांत हाहाकार उडेल. रोगाच्या साथीपेक्षांहि भीति आणि घबराहट यांची साथच सर्वत्र पसरेल. जपानांत अणुबाँब पडल्यावर असेंच झालें. ( २ ) दुसरें कारण असें कीं, हीं रोगजंतुमय युद्धसाधनें तुलनेनें फारच स्वस्त पडतात. एखाद्या लहान राष्ट्रालाहि तें शक्य आहे. एखादें विमान जाऊन रोगजंतू पसरूं लागलें तर, तें खालीं पाडलें जाईपर्यंत अपरिमित नुकसान करील. म्हणून एखाद्या राष्ट्राला पुन्हां 'पुढें' यावयाचें असल्यास त्याला हें अस्त्र फारच अनुकूल वाटेल. ( ३ ) तिसरें कारण असें कीं, माणसाला संसर्गानें बाधणारे रोगजंतु वापरलेच जाणार नाहींत. जीव-शास्त्रीय ( biological ) युद्धतंत्राचा रोगजंतुमय ( bacteriological ) युद्धतंत्र हा एक भाग आहे. जीवशास्त्रीय युद्धतंत्रांत या जंतूप्रमाणेंच बुरशी, विषारी जीवाणू वगैरे इतरहि प्रकार असतात. त्यामुळें मुळांत तें शस्त्र वापरणारावरच ती साथ उलटण्याचा संभव राहणार नाहीं अशा प्रकारें हे जंतु वापरणें शक्य आहे.

"'बोट्युलिझम्' नांवाचा अन्नाला विषमय बन-विण्याचा एक प्रकार वरील दृष्टीनें सर्वोत्तम आहे. या विषाचे वाहक जीवाणू शहरांवरील धुक्यांतून पसरले तर त्या राष्ट्राचें मानसिक धैर्य ( morale ) पार खलास होऊन जाईल. शिवाय हा विषमय जीवाणु प्रजोत्पत्तिक्षम नसल्यामुळें त्याची वाढ होऊन विजयी राष्ट्रावर तो उलटण्याची भीति नाहीं. इतर प्रकारहि शक्य आहेत. 'रिंडरपेस्ट' नामक द्रव्याचा वर्षाव केल्यास त्या राष्ट्रांतील सबंध पशुधन नामशेष होईल. यावर प्रतिबंधक लस आहे. पण सबंध शत्रुराष्ट्रांतील ढोरांवर त्याचा उपचार आगाऊ केलेला असणें संभवनीय नाहीं. उलट तो जंतुप्रयोग



अनुक्रमणिका






करणाऱ्या आक्रमक राष्ट्राला आपल्या देशांतील ढोरांवर त्या प्रतिबंधक लसीचा उपचार आगाऊ करणें शक्य आहे. केवळ भात हेंच मुख्य अन्न असलेल्या राष्ट्रांतील भातशेतांवर एका विशेष माहीत नसलेल्या तांदूळभक्षक बुरशीच्या जीवाणूंचा वर्षाव केल्यास हाहाकार उडेल. जर आक्रमक राष्ट्रांत तांदूळ हें मुख्य अन्न नसेल तर त्याला मात्र विशेष त्रास पोंचणार नाहीं.

" ह्या जीवशास्त्रीय जंतुयुद्धानें होणाऱ्या यातना भयानक स्फोटक रसायनांनीं होणाऱ्या यातनांच्या मानानें कदाचित् कमीच ठराव्यात. एक तर त्यामुळें आक्रमक राष्ट्रें फारशीं विनाश पावणार नाहींत. शिवाय त्यामुळें देशांतील संस्कृतीचा बराचसा भाग शिल्लक राहूं शकेल. अंगांत ताप चढून यातना होणें हें शरीराचा एखादा अवयवच तुटून जाऊन होणाऱ्या भयानक वेदनांच्या मानानें कमीच वाटेल. डोळे फुटणें, आंतडें बाहेर येणें अशा प्रकारांपेक्षां अन्नावांचून भुकेलें राहणें अधिक बरें वाटेल.

" हें चित्र भीषण तर खरेंच. पण युद्धें हीं नेहमीं संहारासाठींच होत असल्यामुळें हा तरतमभाव अशक्य वाटूं नये. यांत भूतदयेचा अभाव आहे असें म्हटलें जातें तें खरें नाहीं. कारण बाकीच्या भयानक युद्धसाधनांच्या मानानें हीं जीवजंतुमय साधनें जरा कमीच यातनादायक ठरतील. ' खरी भूतदयाहीन गोष्ट कोठली असेल तर ती युद्ध करणें हीच आहे ' हें मेजर जनरल वेटसारख्या प्रसिद्ध तज्ज्ञाचें म्हणणेंच खरें आहे. "

## वृक्षसंवर्धन आणि मानवी सुधारणा

भारतीय संस्कृति मुळांत वाढीस लागली अरण्यांत. जगांतील सर्वच संस्कृती मूलतः पाणी आणि वनस्पती यांच्या आसऱ्यानें वाढल्या. म्हणूनच पुरातन हिंदवी साहित्यांत ' आरण्यकां 'ना एवढा मान आहे. परंतु आज आपल्या देशांत ' वनमहोत्सव ' साजरे करून वृक्षवर्धनाची आवश्यकता व महत्त्व लोकांच्या मनांत नव्यानें ठसविण्याचें प्रयत्न करावे लागत आहेत ! यांत्रिक उद्योगधंद्यांच्या वाढीबरोबर रानांची तोड सुरू होऊन पठारें झालीं. जें इतर उद्योगप्रधान देशांत घडलें तेंच हिंदुस्तानांतहि थोड्याबहुत प्रमाणांत घडलें. तेव्हां, या प्रश्नाचें गांभीर्य लक्षांत येण्यासाठीं त्यासंबंधांत तज्ज्ञ शास्त्रज्ञ काय म्हणतात, तें पाहणें उद्बोधक ठरेल. यासाठींच " थिंकर्स् डायजेस्ट " मध्यें आलेल्या फिलिप मेरेट्च्या लेखांतून कांहीं भाग पुढें दिला आहे :

" माझा एक मित्र दक्षिण आफ्रिकन यूनिअनमध्यें गेला होता. त्याच्याजवळ जनरल स्मट्स्सारख्या मुरलेल्या पुढाऱ्यानें उद्गार काढले कीं, आम्हीं जी सुधारणा करूं पाहत आहोंत ती खरोखर अशक्य होईल. कारण असें कीं, चालू काळाची लागवडीची पद्धत पार बदलून नवीन जमीन लागवडीस आणली गेली नाहीं तर त्याचा परिणाम भयंकर होणार आहे. कांहीं थोड्या वर्षांतच सबंध दक्षिण आफ्रिकन जनतेला देशांतील किनाऱ्यालगतच्या भूपट्टीवर जाऊन राहावें लागेल, आणि मधला पठाराचा भाग नुसतें उजाड नि वैराण वाळवंट बनेल.

" तेथें जी गोष्ट घडत आहे ती जरा जास्त विषम परिस्थितीची आहे असें मानलें तरी जगांत सर्वत्र ह्याच प्रकार थोडाफार चालू आहे, आणि त्यामुळें आपली आधुनिक सुधारणा मुळांतच उखडली जाण्याचा संभव आहे.

"म्हणूनच मीं प्राणी आणि त्यांची परिस्थिति यांचा शास्त्रशुद्ध अभ्यास करणाऱ्यां-( ecologists ) च्या ग्रंथांतून आपल्या सुधारणेच्या संरक्षणार्थ काय करतां येईल तें पाहण्याची खटपट करीत आहें; आपली सुधारणा निसर्गाच्या जीवनावर अशी बांडगुळासारखी बसून त्याच्या नाशास कारणीभूत न होतां सृष्टिजीवनाला खरी पोषक कशी होईल, सृष्टींतील भिन्नाभिन्न जीवामध्यें सहयोग ( Symbiosis ) साधण्याचा प्रयत्न कसा करतां येईल तें पाहत आहें.

" किती तरी महान् व भव्य सुधारणा इतिहासास माहीत आहेत कीं ज्या एका अंतर्गत दोषामुळें निष्फळ ठरल्या व विरून गेल्या. तो दोष म्हणजे भूमि शुष्क होऊन जाणें म्हणजेच जमिनीवरील वृक्षांचा सत्यानाश होणें हा होय. वृक्षांचा हा अपरिमित संहार कां व्हावा याचें निश्चित कारण कळत नाहीं, कारण तद्विषयक माहिती उपलब्ध नाहीं. पण हे वनस्पतिजीवनविषयक ( ecological )

रावा. इंग्लंड, आइसलंड किंवा भारत यामध्यें राहणारे किंवा तुर्की वा चिनी संस्कृतीचे असलेले लोक केवळ निरनिराळ्या ठिकाणचे म्हणून भिन्न वंशांचे आहेत असें म्हणणें योग्य नाहीं.

(३) विशिष्ट-समूहवाचक असे तीन गट (ethnic groups) आहेतः मोंगलॉइड, नीग्रॉइड, आणि कॉकेशॉइड. स्वतःच्या शक्तींचा विकास करावयाला समान संधि प्रत्येकाला मिळाली असें जर गृहीत धरलें, तर प्रत्येक गटांतील माणसाची कर्तबगारी सारखीच दिसून येते.

(४) मानवाच्या शक्ती मूळच्या नैसर्गिक कोणत्या, आणि परिस्थिति व शिक्षण यांचा परिणाम म्हणून कोणत्या, यांमधील फरक अचूकपणें शोधून काढण्याच्या कामीं बौद्धिक कसोट्या (Intelligence Tests) लंगड्या पडतात. माणसाचें व्यक्तिमत्त्व किंवा विशिष्ट अस्मिता ही वंशावर अवलंबून नाहीं. एका मानवसमूहाचें नैसर्गिक व्यक्तिमत्त्व दुसऱ्या एखाद्या मानवसमूहाच्या व्यक्तिमत्त्वापेक्षां मूळचेंच अधिक विकसित किंवा श्रेष्ठ आहे असें मानण्यास जागा नाहीं. निरनिराळ्या गटांतील माणसांच्या स्वभावांत मूळचे नैसर्गिकच फरक आहेत असें मानण्यास कांहींच प्रमाण नाहीं; उलट नैसर्गिक शक्तींच्या बाबतींत प्रत्येक गटांतील व्यक्ती आपापसांतच एकमेकांपेक्षां निराळ्या दिसून येतात.

(५) वंशाच्या या कपोलकल्पित 'कल्पने'नें मानवाचें वैयक्तिक व सामाजिक दृष्ट्या अपरिमित नुकसान झालेलें आहे. या 'कल्पने' मुळें अजूनहि कोट्यवधि माणसांना आपला साधा विकासहि करून घेतां येत नाहीं. साहजिकच निर्माणक्षम अशा मानवी मनांची निर्मिति खुंटून गेल्यामुळें मानवी संस्कृति त्यांच्या सहकार्याला मुकून दरिद्री बनते.

युनेस्को-समितीच्या या निर्णयाला एक पुरावा म्हणून 'टाइम्स ऑफ इंडिआ' (२२–७–५०) मधील लेखकानें एका गोष्टीचा निर्देश केला आहे: सुमारें १५ वर्षांपूर्वी प्राणिशास्त्राच्या एका प्राध्यापकानें एक प्रयोग करून पाहिला. दक्षिण अमेरिकेंतील पेरू या देशाच्या अज्ञात मध्यभागीं आदिमानवासारखी असंस्कृत अशी माणसाची 'जात' रहात आहे असें त्या प्राध्यापकांना समजलें. आधुनिक सुधारणेचा ज्याला संपर्कहि नाहीं अशा या मानवसमाजाचें निरीक्षण करण्याकरतां ते गृहस्थ तेथें गेले. तेथें त्यांना एका निर्जनप्राय गांवांत एक लहान मुलगी सांपडली. ते तिला घेऊन आपल्या शहरी संस्कृतींत परत आले. त्यांनीं तिला इतर शहरी मुलींबरोबरच शिक्षण दिलें. त्या मुलीची मानसिक प्रगति आणि सामाजिक विकास हीं विस्मयकारक झालेलीं दिसून आलीं. आज त्या बाई हुशार म्हणून नांवाजल्या असून प्राणिशास्त्रविषयाचा व्यासंग करीत आहेत व त्या प्राध्यापकांना मदत करीत आहेत.

---

## टिळक आणि गांधी—

मी गांधींच्या चळवळींत हिरीरीनें भाग घेतला. मी टिळकांचा भक्त असून गांधींचा भक्त कसा झालों असे प्रश्न मला विचारण्यांत आले. टिळकांच्या मृत्यूनंतर १२ लोकांचें एक कौन्सिल निर्माण करण्यांत आलें होतें. कलकत्त्याच्या कॉंग्रेसमध्यें ठरेल त्याप्रमाणें वागावयाचें ठरलें होतें. टिळकांच्या हयातींत गांधींची चळवळ झाली होती. मी त्याबद्दल टिळकांना विचारलें. ते म्हणाले: 'गांधी नवीन शक्ति निर्माण करीत आहेत. त्यांना उचलून धरा, त्यांच्याबद्दल जोरानें बोला व त्याचा परिणाम जनतेवर काय होतो तो त्यांना सांगा.' मी त्यावेळीं कांहीं सभांतून हा प्रचार केला व त्याचा परिणाम बरा झाला असें मी त्यांना सांगितलें. गांधींची चळवळ देशघातक आहे अशी लो. टिळकांची कल्पना नव्हती. मी गांधींच्या चळवळींत पडलों तो टिळकांच्या पक्षांत होतों म्हणून पडलों. खाडिलकर म्हणत: 'टिळकांच्या कार्यांतूनच गांधींची चळवळ निघाली.' दोघेहि थोर गृहस्थ होते. मी टिळकांच्या उलट वागलों असें मला वाटत नाहीं. स्वातंत्र्य मिळविणें हाच मुख्य प्रयत्न होता. मी भावनाप्रधान आहें व त्या वृत्तीनें मी कार्य केलें.

—श्री. गंगाधरराव देशपांडे, (१।८।५० सातारा येथील भाषणांतून)

अनुक्रमणिका








मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष